# वेड्यांचा चौकोन

[ तीन अंकी सामाजिक नाटक ]




: लेखक :

गंगाधर गाडगीळ



प्रथमावृत्ति



१९५२

मूल्य :

सव्वा रुपया

लाखाणी बुक डेपो

रामचंद्र बिल्डिंग, गिरगांव, मुंबई ४.

# निवेदन

एखादी नाटिका अगर कथा लिहिली म्हणजे मी तिच्याविषयीं विचार करीनासा होतों. परंतु रेडिओकरितां लिहिलेल्या तीन नाटिकांच्या कल्पना मात्र नंतरही माझ्या डोक्यांत घोळत होत्या. आणि त्यांच्या आपोआप झालेल्या संकलनांतून हें छोटें नाटक निर्माण झालें आहे.

निव्वळ गंमत म्हणूनच मीं त्या नाटिका लिहिल्या होत्या आणि त्याच भूमिकेवरून हें नाटकही लिहिलें आहे. एखादी कलाकृति निर्माण करतांना जो एक प्रकारचा कांटेकोरपणा लेखक दाखवीत असतो, कलात्मक मूल्यांविषयीं जी जागरूकता दाखवतो ती हें नाटक लिहितांना मीं विशेषशी दाखवलेली नाहीं. स्वैरपणानें जसें वाटलें तसें लिहीत गेलों. ह्यामुळें नाटकाच्या गुणदोषांत काय भर पडली आहे तें वाचकांनींच ठरवायचें आहे.

मात्र जातां जातां वाचकांना एक गोष्ट सांगावीशी वाटते. ह्या नाटकांतील विनोद एका विशिष्ट प्रकृतीचा आहे. तो farsical आहे. हें ओळखून तें वाचलें तरच त्याचें रसग्रहण नीट करतां येईल.

२७-४-५२ गंगाधर गाडगीळ

मुद्रक : श्री. श्री. मा. दळवी, कल्पना प्रि. प्रेस, दादर, मुंबई, २८.
प्रकाशक : श्री. वी. जे. लाखाणी, लाखाणी बुक डेपो, गिरगांव, मुंबई, ४.

# १



[ शहराबाहेरची एकाकी जागा. मागल्या बाजूला पडकी भिंत आहे आणि एका बाजूला पडकें घर आहे. बन्या आणि मंदा प्रवेश करतात. ]

**मंदा :** पुरे झालें बाई फिरणें. खूप दूर आलों आपण. चला, आतां परत जाऊं या.

**बन्या :** परत ? आणि इतक्यांत ? आतां तर कुठें सुरुवात झाली आहे आपल्या फिरण्याला. अग ! एकमेकांपासून असें दोन हात अंतरावरून चालायचें, ह्याला का फिरणें म्हणायचें ? मंदा, लाडके ......

[ तिचा हात पकडण्याचा प्रयत्न करतो. ]

**मंदा :** नको, नको ! दोनाचे चार हात होईपर्यंत असें दोन हात अंतर ठेवणेंच बरें, नाहीं का ?

**बन्या :** बरें ! ठेवा ! अंतर ठेवा ! दोन हात कशाला ? चांगले दोन मैल अंतर ठेवा कीं. आणि दोन मैलांनीं तरी कां भागावें ? सगळा अटलांटिक महासागर नाहीं तर हिमालय पर्वतच आणून ठेव कीं आपल्या दोघांच्या मध्यें.

**मंदा :** बाई ! बाई ! बाई ! केवढा हा राग ! तुमच्या भौगोलिक रागाच्या ह्या भूकंपानें मी तर बाई अगदीं हादरून गेलें. खरेंच ! इतके रागवलां तुम्ही ? अगदीं मान फिरवून उभे राहण्याइतके ?

**बन्या :** तूंच सांग आतां मंदा, रागवूं नको तर काय करूं ग मी ? इतका वेळ चालतोंय आपण, पण एकदा तरी तुझा धक्का लागला का मला ? म्युनिसिपॅलिटीच्या खांबांचा, पोस्टाच्या पेटीचा, बेवारशी गायीचा आणि

मोटरीच्या मडगार्डचा देखील धक्का मला आतां रस्त्यांत लागला. पण तुझ्या पदराच्या टोकाचा देखील मला स्पर्श झाला नाहीं. एका शिखाची सबंध दाढी ब्रशासारखी माझ्या तोंडावरून फिरली. पण तुझ्या केसांची बट देखील माझ्या गालाजवळ भुरभुरली नाहीं. एका पेन्शनराची बगलेंत धरलेली छत्री माझ्या छातींत टोचली. पण तुझे कोपर एकदाही माझ्या बरगडींत रुतले नाहींत.

**मंदा :** ह्याचा अर्थ इतकाच कीं, धक्का मारायचें तंत्र तुम्हांला अजून साधलेलें नाहीं.

**बन्या :** म्हणजे! कथाकादंबऱ्यांचें असतें तसें ह्यांचेंही तंत्र असतें म्हणतेस! हें तंत्र फार बोकाळलंय् बुवा अलीकडे. आतां हें तंत्र कुठें शिकायचें? असें कर ना, तूंच शिकव मला हें तंत्र.

**मंदा :** किती वेडे आहांत तुम्ही. तुम्हांला कांहीं कांहीं समजत नाहीं.

**बन्या :** कांहीं समजत नाहीं काय? अस्सें. बरें, काय ग? मी तुला येथें कशाला आणलंय् असं वाटतंय् तुला?

**मंदा :** कशाला म्हणजे? फिरायला.

**बन्या :** हो, म्हणजे आणलंय् फिरायलाच तुला. पण असें उघड्यावर फिरण्याऐवजीं आपण त्या पलीकडच्या घरांत कां फिरूं नये जरा?

**मंदा :** घरांत? आणि फिरायचें?

**बन्या :** काय हरकत आहे म्हणतों मी?

**मंदा :** हरकत नाहीं. पण मग इतकें लांब तरी येण्याची काय गरज होती? आपापल्या घरांतच आपण फेऱ्या मारल्या असत्या तरी चाललें असतें कीं.

**बन्या :** पण आपल्याला घरें आहेतच कुठें? तूं राहतेस कुणा काकामामाच्या घरीं, आणि मी राहतों सुमारें पांच निरनिराळ्या माणसांच्या घरीं. आणि हल्लीं मुंबईच्या घरांत माणसांना चालण्याइतकी जागा असेल ह्या गोष्टीवर आपला बिलकुल विश्वास नाहीं.

**मंदा :** म्हणूनच म्हणतें कीं कांहींतरी धडपड करून एखादा छानसा फ्लॅट मिळवा.

**बन्या :** फ्रूट मिळवूं ग मग, पण आतां तर त्या घरांत येशील. बाहेर फार ऊन लागतंयू नाहीं, हुश्श ! Very hot.

**मंदा :** अहो महाशय ! जानेवारी महिना आहे हा. थंडीचे दिवस आहेत सध्यां.

**बन्या :** असें ? पण मला तर तुझी ओळख झाल्यापासून सतत उन्हाळा चालू आहे असंच वाटतंयू. बरें, चल, घरांत चल. निदान या भिंतीच्या आड तरी चल. मला कानांत गंमत सांगायची आहे तुझ्या एक.

**मंदा :** मग इथं सांग कीं. इथें कोणी नाहीं.

**बन्या :** मला बुवा लाज वाटते.

**मंदा :** इश्श ! हें का लाजणें झालें ! पोटांत दुखत असलें म्हणजे माणसें अशीं तोंडें करतात.

**बन्या :** बरें बुवा ! केलें आम्हीं तोंड वेडेंवांकडें. पण मग गोड कां करत नाहींस तूं ? तुझ्या तोंडातली एक चमचा साखर माझ्या तोंडांत टाकलीस ...

**मंदा :** इश्श !

**बन्या :** चल ना, लाडके ! माझी अशी अगदींच निराशा करूं नको.

**मंदा :** नको गडे. मला भीति वाटते.

**बन्या :** भीति ! चुंबन म्हणजे सुरळ आहे कीं काय त्याची भीति वाटायला ?

**मंदा :** तसें नाहीं. मला या पडक्या घरांत जायची भीति वाटते. त्यांत म्हणे भूत आहे.

**बन्या :** भूत ! कांहींतरी कल्पना आहे झालें तुझी.

**मंदा :** नाहीं हो. खरेंच आहे भूत तेथें. एकट्या दुकट्या बायका इथं फिरायला आल्या म्हणजे म्हणे तें मिठ्या मारतें त्यांना.

**बन्या :** मिठ्या मारतं ? वा ! मोठें रसिक भूत दिसतंय हें. पण मला वाटतंय कीं, हें भूत नसून माझा मित्र राजा असावा.

**मंदा :** तुमचा मित्र राजा ?

**बन्या :** हो, प्रेम करायचं जबरदस्त व्यसन जडलंय त्याला. त्याच्या दृष्टीला पडणाऱ्या प्रत्येक मुलीवर तो प्रेम करतो.

**मंदा :** बाप रे ! प्रेमाचा मोठाच साठा असला पाहिजे त्याच्याजवळ.

**बन्या :** नाहीं ! तसें नव्हे ! प्रत्येक मुलीवर तो आपलें नवटांक पावशेर इतकेंच प्रेम करतो.

**मंदा :** सगळेच पुरुष मेले असेच असतात.

**बन्या :** नाहीं हं, मी मात्र मुळींच तसा नाहीं. माझें हें सव्वाशें पौंडांचें शरीर म्हणजे सव्वाशें पौंड प्रेमच आहे असें समज तूं. आणि तें सगळें तुझेंच आहे. लाडके ! आतां ह्या प्रेमाच्या करारावर शिक्कामोर्तब ...

**मंदा :** बरें बाई ! चला !

[ पडक्या घरांत 'हरामखोरा ! हें घे तुझ्या पापाचें प्रायश्चित्त' असा आवाज येतो. मंदा किंचाळते. ]

**बन्या :** ऑं ! काय झालें ? लाजलीस वाटतें तूं ?

**मंदा :** डोंबलें तुमचें. भूत ओरडलेलें ऐकलेंत नाहीं का तुम्हीं ?

**बन्या :** छे ग ! भूत कुठें ओरडलें ? भास झाला असेल तो तुला.

**मंदा :** भास नाहीं हो. खरेंच ! चला, आपण आपले जाऊं या —

**बन्या :** थांब ! मी त्या भुताची खोडकीच मोडतों. तंगडीच मोडतों गुलामाची.

**मंदा :** नको. नका जाऊं आंत. मेलें, मेलें. धावा.

**बन्या :** चू ! फारच भित्री बुवा तूं.

**मंदा :** असू दे !

**बन्या :** बरें तें राहूं द्या. पण लाडके, तो शिक्कामोर्तब करायचा राहिला आहे तेवढा करून टाकूं या. या घरांत नाहीं तर निदान ह्या भिंतीआड तरी चल......

**मंदा :** तें कांहीं नाहीं. आतां तें सगळें करायचें तें चार भिंतींच्या आडच. पहिल्यानें तुम्ही जागा मिळवा आणि मग आपण लग्न करून टाकूं या.

**बन्या :** अग ! त्या प्रयत्नांत आहे मी. पण ......

**मंदा :** नेहमीं अशाच थापा मारता तुम्ही मला. कितीतरी लोक जागा मिळवतात. तुम्हांलाच तेवढी कशी नाहीं हो मिळत !

**बन्या :** लोक जागा मिळवतात असें सांगणारे लोक मला अनेक भेटले आहेत. पण ते जागा मिळवणारे लोक मात्र कधीं कोणाला भेटल्याचें माझ्या ऐकीवांत नाहीं. जागा मिळवणें म्हणजे काय सोपें काम आहे? आधीं एखादें रिकामें घर मिळालें पाहिजे. आणि मग त्या घराच्या मालकाचें घर भरण्याइतका जवळ पैसा असला पाहिजे.

**मंदा :** पुरे झालें तुमचें. तुमच्या अंगांत मुळीं धमकच नाहीं. कर्तबगारीच नाहीं. उद्योग, उत्साह ह्यांच्या द्वारें उन्नति आणि उत्कर्ष साधायची ईर्षाच तुमच्या मनांत नाहीं.

**बन्या :** मंदा! मंदा! अग मुंबईपासून बोरिवलीपर्यंत जागा शोधत मी चारदां चालत गेलों हें तुला माहीत आहे. आणि तरी तूं माझ्या अंगांत उद्योग आणि उत्साह नाहीं असें म्हणतेस ?

**मंदा :** पण खूप पैसे कां नाहीं मिळवत तुम्ही ?

**बन्या :** सध्यां महिन्याकाठीं एकशें तीस रुपये अकरा आणे नऊ पै मिळवतोंय कीं मी. आणखी किती पैसे मिळवायचे ?

**मंदा :** हजार वेळां सांगितलंय् कीं, शब्दकोडें सोडवा आणि पहिलें बक्षीस मिळवा. पण अजून पहिलें बक्षीस काय, पण कुपनें देखील मिळवलीं नाहींत तुम्हीं.

**बन्या :** अग ! पण थोडा का प्रयत्न केला मीं ! शब्दकोडीं सोडवून माझ्या डोक्याचा शब्दकोश झाला आहे. हें बघ, हें शब्दकोडेंच माझ्या खिशांत आहे. पण ......

**मंदा :** मला तें कांहीं समजत नाहीं. ह्या चोरटेपणाला मी अगदीं कंटाळून गेलें आहे. आतां पहिल्यानें जागा मिळवा आणि मगच मला भेटण्याचा प्रयत्न करा. ही मी चाललें. जातें मी.

**बन्या :** अग–अग–गेली ! हुश ! ( खिशांतून शब्दकोड्याचा कागद काढीत ) बन्याजीराव ! आतां बसा शब्दकोडें सोडवीत. ह्या काळ्या पांढऱ्या चौकोनांत बसा आपलें दैव हुडकीत. आणि अर्जुनानें जसा माशाचा डोळा फोडून द्रौपदी मिळवली, तसें चाळीस हजारांचें बक्षीस मिळवून मंदा मिळविण्याची दाखवा मर्दुमकी. बस ! मिळवलेंच पाहिजे बक्षीस. हां. हा ध्या पहिला शब्द ...... डाकू कीं चाकू का मुळीं काकूच. ( थांबून ) आणि तसें पाहिलें तर चिकू कां नाहीं ? पण चाळीस हजार रुपये बक्षीस देऊं करणाऱ्या माणसाला चिकू हा शब्द कसा सुचेल बरं ! आणि तसें पाहिलें तर कां सुचूं नये ? चाळीस हजार रुपये रोख देणारा हा मनुष्य चिकूच्या करंड्याच्या करंड्या कशावरून खाऊन फस्त करीत नसेल ! मग काय डाकू, चाकू, काकू कीं चिकू ?

[ राजा प्रवेश करतो. राजा देखणा आहे आणि चाणाक्ष पण आहे. पण वयानें बन्याच्याच वर्गातला असल्याकारणानें चाणाक्षपणा कधीं कधीं अंगावर उलटतो इतकेंच. ]

**राजा :** चाकू ! चाकू !

**बन्या :** आं ! कोण ? ( इकडे तिकडे पाहतो. राजा भिंतीच्या आड लपतो. ) हा राजा आला कीं काय लेकाचा ? ( भिंतीभोंवतीं फेरी घालतो. राजा त्याला चकवतो. ) येथें तर कोणीच दिसत नाहीं. मग ? आकाशवाणी झाली कीं काय ? देवा ! दीनदयाळा ! एवढें कोडें सोडवायला मदत कर. ब्रह्म आणि मायेचें कठीण कोडें नाहीं सोडवायचें मला. फक्त शब्दकोडें नं. २३९ चें उत्तर मला पाहिजे आहे. बरें ! आतां चटकन् सांगा उत्तर देवा ! आणखी दुसऱ्या अपॉइंटमेंटस् असतील तुम्हाला. (डोळे मिटून घेतो.) डाकू, चाकू, काकू कीं चिकू ?

[ राजा भिंतीच्या आडून डोकें वर काढतो आणि एक चाकू बन्याच्या पुढें टाकतो. ]

**बन्या :** (डोळे उघडतो) आँ ! देवा ! खरोखरच प्रसन्न झालांत तुम्हीं माझ्यावर ! मग आतां हा दुसरा शब्द सांगा. हातोडी कीं कातोडी ? (घाबरून)

पण देवा! चाकू टाकलांत तें ठीक होतें, पण आतां हातोडी किंवा कातोडी मात्र माझ्या डोक्यावर टाकूं नका. (डोळे मिटून घेतो) बोला देवा! हातोडी की कातोडी?

[राजा पुन्हा डोकें वर काढतो आणि
आपली चप्पल बन्याच्या डोक्यांत टाकतो.]

**बन्या :** अरे बापरे! आँ! चप्पल? देवा, चप्पल येथें बसत नाहीं. येथें कातोडी तरी पाहिजे नाहीं तर हातोडी तरी पाहिजे.

[राजा पुन्हा बन्याच्या डोक्यांत चप्पल टाकतो.]

**बन्या :** आँ! कोण चावटपणा करतंय् हें! (उठतो) राजाच असला पाहिजे हा लेकाचा. (भिंतीभोंवतीं फिरतो. राजा त्याला चकवतो. अखेर राजा मागें सरकत येतो आणि अलद बन्याच्या हातांत सांपडतो) अरे हरामखोरा!

**राजा :** (हंसतो) काय रे बन्या! परमेश्वराशीं इतक्या खाजगी गप्पागोष्टी कशाला करीत होतास?

**बन्या :** (सुस्कारा सोडून) काय सांगूं राजा तुला! मला सध्या पैशाची फार गरज आहे.

**राजा :** मग त्याकरितां वडिलांना तार पाठवायची कीं परमेश्वराचा धावा करायचा?

**बन्या :** तार करून मिळण्यासारखी नाहीं ही रक्कम. वीस पंचवीस हजार रुपये पाहिजे आहेत मला.

**राजा :** अबबब! अबबबत जेवढे ब नाहींत तेवढीं शून्यें आहेत कीं रे ह्या रकमेंत. एवढी रक्कम तुला पाहिजे तरी कशाला?

**बन्या :** राजा! खरें सांगूं? मी प्रेमांत सांपडलोंय् रे.

**राजा :** हात्तिच्या! मला वाटलें कीं तूं सिनेमा कंपनी काढली आहेस. प्रेमाचें काय एवढें घेऊन बसलास. मी तर रोज एकदा तरी प्रेमांत सांपडत असतों. आणि सध्यां तर ......

**बन्या :** राजा, तुझ्या प्रेमाची माझ्या प्रेमाशीं तुलना करूं नको. दिसेल त्या देखण्या पोरीला पावशेर प्रेमाचा रतीब घालणारा तूं! तुला प्रेमाची महती काय कळणार?

**राजा :** बरें बुवा! तुझें प्रेम अगदीं एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिकाएवढें मोठें आहे ......

**बन्या :** आं! आ! काय म्हणालास? एक सायकल ......

**राजा :** अरे वेड्या! एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिका ......

**बन्या :** कोणीतरी महापुरुष असावा हा. कोण बरें?

**राजा :** कोण म्हणून काय विचारतोस? हिप्पॉपोटॅमसचे तीर्थरूप नव्हेत का ते?

**बन्या :** असें असें! असतात बुवा जगांत एक एक मोठालीं माणसें.

**राजा :** तेव्हां सांगायचें काय कीं, तुझ्या प्रेमाची थोरवी आपल्याला एकदम कबूल आहे. पण त्याकरितां एवढे पैसे कशाला हवेत? प्रेम म्हणजे काय प्रॉव्हिडंट फंड समजलास कीं काय तूं? कीं प्रेमाची इतिश्री झाल्यामुळें, तूं एखादा शिमीट कॉंक्रीटचा ताजमहाल बांधायला घेतला आहेस?

**बन्या :** ताजमहाल नको आहे मला. राहायला घर हवें आहे. काकाकडे तोंड धुवायचें, इराण्याकडे चहा प्यायचा, आत्याकडे आघोळ करायची, हॉटेलांत जेवायचें आणि मामाकडे कोळशाच्या पोत्याशेजारीं झोपायचें, असें चाललंयू माझें हल्लीं. सांग, मित्रा सांग, प्रेमाची परिपूर्ती कशी व्हायची अशा परिस्थितींत?

**राजा :** मित्रा, एखाद्या ज्वलंत लेखणीच्या संपादकानेंच जिच्यावर मौलिक वैचारिका मांडावी अशी ही वैश्विक समस्या आहे. पण मला वाटतें कीं, पूर्वी प्रेमकथांत अनावश्यक वाटणारा सासरा नांवाचा प्राणी ह्या बाबतींत आवश्यक ती मदत करूं शकेल.

**बन्या :** तीच तर अडचण आहे राजा. तो हुकुमाचा एक्काच पांच वर्षांपूर्वी स्वर्गवासी झाला. त्यामुळें माझी प्रेयसी सध्यां आपल्या काकाकडे राहते. आणि पाणी भरायच्या पिंपाशेजारीं झोपते.

**राजा :** अस्सें ! म्हणजे तूं कोळशाच्या पोत्याशेजारीं झोपतोस आणि ती पाणी भरायच्या पिंपाशेजारीं झोपते. मग तुम्हीं एकमेकांवर प्रेम करावें हें साहजिकच आहे.

**बन्या :** राजा ! गाढवा ! माझ्या हृदयांत अशी आग पेटलेली असतांना...

**राजा :** डरो मत् बन्या ! तुझ्या प्रेयसीजवळ पाण्यानें भरलेलें पिंप आहे.

**बन्या :** कर थट्टा ! गरीबी हें मोठें पाप आहे, ह्यांत शंका नाहीं.

**राजा :** मोठा वक्ता होणार तूं बन्या ! 'ह्यांत शंका नाहीं', 'मला असें वाटतें', 'हरकत ती कोणती', 'तसें पाहिलें तर' असे शब्द वारंवार वापरणारा मनुष्य, महाराष्ट्रातला नामांकित वक्ता असावा असें डोळे मिटून सांगावें.

**बन्या :** डोळे उघडे ठेवून जरी तूं शब्दकोडें नंबर २३९ चें उत्तर सांगितलेस तरी मला त्याचा जास्त उपयोग होईल.

**राजा :** बरें तर. हा तल्लख मेंदू तुझ्या सेवेला हजर आहे. शब्दकोडें सोडवायचें म्हणजे कोडें घालणाऱ्या माणसाची सायकॉलॉजी ओळखली पाहिजे.

**बन्या :** आतां ह्या बाईची कशी ओळख काढायची ?

**राजा :** अरे मूर्खा ! सायकॉलॉजी म्हणजे मानसशास्त्र.

**बन्या :** असें होय. आपल्याला बुवा इंग्रजी कळत नाहीं, कारण मीं बी. ए. ला मराठी घेतलें होतें.

**राजा :** त्यापेक्षां टाइपरायटिंग कां नाहीं घेतलेंस बी. ए. ला ? तुझें ज्ञान अधिक वाढलें असतें त्यामुळें. बाकी कदाचित् तें जमलें नसतें तुला. माझ्या एका मित्राला टाइपरायटिंग येईना, तेव्हां तो मराठी घेऊन पी. एच्. डी. झाला.

**बन्या :** विषयांतर करूं नको. त्याचें मानसशास्त्र कसें ओळखायचें तें सांग.

**राजा :** आतां असें पाहा, ह्या उभ्या शब्दाच्या क्ल्यूजमध्यें 'प' हें अक्षर किती वेळां आलें आहे ?

**बन्या :** एक ... दोन ... तीन ... तेवीस वेळां आलें आहे.

**राजा** : ह्याचाच अर्थ असा कीं, 'प' हें अक्षर कोडें घालणाऱ्या माणसाला फार आवडत असावें. आतां 'प' ह्या अक्षरावरून तुला काय सुचतें ?

**बन्या** : प-प-प-प-प – नाहीं बुवा. कांहींच सुचत नाहीं.

**राजा** : मूर्खा ! 'प' ह्या अक्षरावरून पाइप हा शब्द नाहीं सुचत तुला ?

**बन्या** : हा. आतां तूं सांगितल्यावर सुचते आहे.

**राजा** : तूं नवसाहित्य वाचत असतास तर तुला हें आधींच समजलें असतें. नवसाहित्यिक माणसाच्या मनांतले विचार असेच ओळखतात.

**बन्या** : म्हणजे ! राजा, तूं नवसाहित्य देखील वाचतोस ?

**राजा** : छे ! पण टीका मात्र करतों त्याच्यावर. असा बघतोस काय ! ज्याच्यावर टीका करायची तें वाचायचें नाहीं हा टीकाशास्त्राचा पहिला दंडक तुला माहीत नाहीं वाटतें अजून ? म्हणे मराठी घेऊन बी. ए. झालों !

**बन्या** : विषय बदलूं नको, त्या तुझ्या सायकॉलॉजीविषयीं बोल.

**राजा** : हं, बरी गाडी वळणावर आणलीस. तेव्हां आपण असा निष्कर्ष काढला कीं कोडें घालणारा माणूस पाइप ओढत असावा. 'प' हें अक्षर तेवीस वेळां ज्या अर्थी त्यानें वापरलें आहे त्या अर्थी तो तेवीस वेळां पाइप ओढत असावा. आणि उभ्या शब्दांच्या क्लूजमध्यें ज्या अर्थी त्यानें तें अक्षर वापरलें आहे त्या अर्थी तो उभा राहूनच पाइप ओढत असावा.

**बन्या** : अबबब ! किती तल्लख मेंदू आहे रे तुझा राजा ? रात्री तुझ्या कानांतून बॅटरीसारखा प्रकाश बाहेर पडतो का रे ? ऑं ! अरे गुप्त पोलिसाचा मेंदू आहे तुझा ! रहस्यकथालेखक बेगुमान् तुझे कोण लागतात रे ?

**राजा** : माझे नातू असावेत ते बहुधा. पण हें बघ बन्या, ह्या शब्दकोड्यांचा प्रश्न आपण नंतर हातांत घेऊं. सध्यां माझ्यापुढें एक बिकट प्रश्न आहे.

**बन्या** : आणि तूं तो अजून सोडवला नाहींस ?

**राजा** : तो सोडवायचा कसा ह्याची मीं योजना आंखली आहे. पण ती अमलांत आणण्याकरितां मला एका धाडसी मित्राची मदत हवी आहे.

**बन्या** : पण तुझा प्रश्न तरी काय आहे ?

**राजा :** मी प्रेमांत सांपडलों आहे बन्या. गळ्याइतका प्रेमांत बुडालों आहे. आणि प्रीतीच्या हौदांतलें पाणी रोज एक इंचानें वाढत आहे.

**बन्या :** अशा स्थितींत तूं केव्हां बुडशील तें समजायला हवंय् होय ! हें तर अगदीं सोपें काळ काम वेगाचें गणित आहे.

**राजा :** नाहीं, मला बुडून चालणार नाहीं. मला जिंकलें पाहिजे, माझी प्रीति सफल झाली पाहिजे.

**बन्या :** राजा ! कंटाळलों बुवा ह्या तुझ्या प्रेमांत पडण्याला. अरे, रोज कसला प्रेमांत पडतोस ? एखाद्या दिवशीं तरी सुट्टी द्यावी त्या स्त्रीजातीला. मला वाटतें कीं, प्रेमांत पडतोय असें वाटलें कीं डोक्यावर तूं एक थंड पाण्याची बादली ओतून घेत जा. त्यानें कदाचित् तुझें हें दुखणें बरें होईल !

**राजा :** नाहीं रे बन्या ! हें अगदीं शेवटलें आणि खरें प्रेम आहे.

**बन्या :** परवां देखील तूं हेंच म्हणत होतास. पण तें शेवटलें न ठरतां त्याचाच मात्र शेवट झाला. आणि आतां आज हें नवीन.

**राजा :** परवांचें कसलें रे तें बन्या ! त्या पोरीला प्रेमाची चाडच नव्हती. मीं माझें प्रेम तिला सांगितलें तर ती म्हणाली कीं, तुमच्यावर प्रेम करण्यापेक्षां मी सार्वजनिक नळावर प्रेम करीन.

**बन्या :** मग तूं ताबडतोब सार्वजनिक नळासारखा कमरेंत वाकून आणि तोंड वासून तिच्यासमोर उभा राहिलास कीं नाहीं ?

**राजा :** छोड दे वह बात बन्या ! आतां ह्या पोरीवर मात्र माझें खरोखर प्रेम बसलें आहे. ह्यापुढें जन्मभर माझा रोजचा प्रेमाचा रतीब मी तिलाच घालणार.

**बन्या :** बरें मग. होऊं दे कीं सुरू तुझा रतीब.

**राजा :** त्यांत अशी अडचण आहे बनाजीराव, कीं तिचें माझ्यावर प्रेम आहे हें अजून तिच्या ध्यानांत आलेलें नाहीं.

**बन्या :** सबूर ! सबूर ! फार गुंतागुंतीचें बोलायला लागलास तूं अलीकडे. राजा, काय म्हणालास तूं ? तिचें माझ्यावर प्रेम आहे ......

**राजा** : तुझ्यावर नव्हे माझ्यावर ......

**बन्या** : मग तेंच म्हणतोंय ना मी. तिचें माझ्यावर ......

**राजा** : च्! च्! सांगण्याचा एकंदर अर्थ असा कीं, तिचें सुप्रसिद्ध रहस्यकथालेखक बेगुमान् ह्यांच्यावर प्रेम बसलें आहे.

**बन्या** : हें कसें काय कळलें तुला?

**राजा** : तीच मला म्हणाली कीं, तुमच्या हृदयमंदिरापेक्षां बेगुमान्च्या कमरेचें पिस्तुल मला अधिक आवडतें.

**बन्या** : म्हणजे? हे बेगुमान् कमरेला पिस्तुल लावून हिंडतात कीं काय!

**राजा** : असें दिसतंय्.

**बन्या** : मग संभाळ रे बाबा.

**राजा** : अरे, पिस्तूलच काय पण खांद्यावर तोफ घेऊन तो गृहस्थ हिंडत असला तरी मी त्याला डरणार नाहीं. बरें का बन्या! माझें शौर्य तिच्या दृष्टीस पडावें म्हणून मीं एक डाव रचला आहे.

**बन्या** : लहानपणीं लंगडीच्या खेळात मिळवलेलें प्राविण्यपदक तिला दाखवणार आहेस कीं काय?

**राजा** : नाहीं. पण एका दुष्ट चोरापासून मी तिचें संरक्षण करणार आहे.

**बन्या** : ए हे रे बहाद्दर.

**राजा** : आणि त्या चोराची भूमिका तूं करावीस असें माझें मत आहे.

**बन्या** : ऑं! ऑं! काय म्हणालास?

**राजा** : अगदीं सोपें आहे बघ सगळें बन्या. मी तुला देतों तो चटेरी पटेरी अंगरखा तूं घाल, डोळ्यांना एक काळें फडकें बांध, आणि ती आली कीं हातांत चाकू घेऊन तिच्यावर हल्ला कर. तुझ्या हल्ल्यानें ती घाबरली कीं मी धावत येईन आणि तुला नामोहरम करून टाकीन.

**बन्या** : असा डाव आहे होय तुझा! तरी म्हटलें, मघांपासून इतक्या प्रेमानें कां वागते आहे स्वारी. तें कांहीं नाहीं राजा! आपण तुझ्या भानगडींत पडायला तयार नाहीं. मागें तुझें एक प्रेमपत्र मी पोरीला म्हणून द्यायला गेलों

आणि ती त्या पोरीची आई निघाली. त्या दिवशीं मागच्यामागें लांब उडी मारण्याचा मीं उच्चांक गांठला म्हणून बचावलों. नाहीं तर......

**राजा :** असा माझा अवसानघात करूं नको. आपण बालपणापासूनचे मित्र नाहीं का बरें ?

**बन्या :** नाहीं.

**राजा :** बन्या, लिमलेटची एक गोळी, तूं थोडा वेळ तोंडांत धरायची आणि मग मीं थोडा वेळ तोंडांत धरायची, अशा रीतीनें आपण खाल्लेली नाहीं का बरें !

**बन्या :** असेल ! मग ?

**राजा :** ऑं ! आणि आपण दोघे एकाच सायकलीवरून जात असतांना पोलिसानें आपल्याला पकडलें नव्हतें का ?

**बन्या :** होय ! होय ! मग म्हणणें तरी काय तुझें ?

**राजा :** वक्तृत्वाच्या चढाओढींत मीं भाषण केलें तेव्हां तूं एकट्यानेंच टाळ्या वाजवून सगळा हॉल दणाणून टाकला नव्हतास का ?

**बन्या :** होय रे राजा. आपण फार जुने दोस्त आहोंत.

**राजा :** मग आपल्या जुन्या दोस्तीकरितां एवढें नाहीं करणार तूं ?

**बन्या :** राजा ! राजा ! बनवतो आहेस तूं मला.

**राजा :** तुझ्यासारख्या हुषार माणसाला बनवायचा प्रयत्न करायला काय मी मूर्ख आहें ?

**बन्या :** बरें. आण तो अंगरखा इकडे. पण काय रे, सगळे चोर काळ्या पांढऱ्या पट्टयांचा अंगरखा कां घालतात ?

**राजा :** त्याचें असें आहे कीं, त्यावरच्या काळ्या पट्टयांमुळें ते अंधारांत लोकांना दिसत नाहींत आणि पांढऱ्या पट्टयांमुळें उजेडांत दिसत नाहींत.

**बन्या :** आणि तोंडावर हें काळें फडकें कशासाठीं ?

**राजा :** वा ! त्याशिवाय लोकांना ते चोर आहेत हें कळणार कसें ? आणि लोक त्यांना भिणार कसे ?

**बन्या :** बाकी चोरांची जात एकंदर चलाख खरी. आणि चोराचे कपडे चढवल्यामुळें माझ्याही डोक्यांत एक चलाख कल्पना आली आहे. राजा, तुझे बूट दे मला. म्हणजे पोलीस पावलांचे ठसे ओळखीत पाठापोठ आले तरी तुझ्याच घरीं जातील.

**राजा :** म्हणजे माझे बूट घालून तूं आपल्या घरीं जाशील आणि त्यांचा माग घेत पोलीस माझ्या घरीं येतील, असेंच ना तुझें म्हणणें ?

**बन्या :** बरोबर ओळखलेंस. पण तुझे बूट मला लहान होत आहेत रे.

**राजा :** चल, चल. आटप लवकर. लांबून कोणीतरी येतांना दिसतंय्. तीच असावी बहुधा.

**बन्या :** आणखी देखील दिसतंय् कोणीतरी बरोबर.

**राजा :** आणि हें बघ, आपण जरा त्यांचें बोलणें ऐकूं आणि मगच तूं हल्ला कर.

[ दोघे बूट बदलल्यामुळें धडपडत भिंतीआड जातात. बन्या चाकू विसरून जातो. राजा धावत येऊन तो घेऊन जातो. थोड्या वेळानें कुंदा आणि तिची आई प्रवेश करतात. कुंदा ही तरुण आणि 'स्मार्ट' मुलगी आहे. सिंधूताई ह्या तिच्या मातोश्री ; मध्यम वयाच्या असल्या तरी त्यांचा उत्साह तरुण मुलींना लाजवणारा आहे. ]

**कुंदा :** किती निवान्त आणि छान जागा आहे, नाहीं ग आई ! इथें भूत असेल तरी कसें ?

**सिंधूताई :** अशा शांत आणि निवान्त जागींच भुतें असतात आणि खून होतात बरें. किती छान भीति वाटते आहे नाहीं ग येथें ! ... बेगुमानांच्या रहस्यकथेंत सुंदर नायिका एकटी अशा जागीं फिरायला आली म्हणजे खुशाल समजावें कीं, ही कांहीं आतां परत जात नाहीं.

**कुंदा :** बेगुमान् किती धाडसी आहेत म्हणून सांगूं आई ! त्यांना चहा हवा असला म्हणजे ते Bell वाजवत नाहींत, तर पिस्तूल उडवतात.

**सिंधूताई :** अगबाई ! खरें कां ? मग जेवण हवें असलें म्हणजे तोफाच उडवत असतील ते.

**कुंदा :** त्यांचे म्हणे तीन सेक्रेटरी आहेत. बेगुमान् सकाळीं उठून एकाला लिहायला बसवतात. ते इतक्या वेगानें बोलतात म्हणे कीं तीन तास लिहून घेतल्यावर पहिला सेक्रेटरी बेशुद्ध पडतो. मग बेगुमान् एक कप चहा पितात. आणि मग तीन तास पुन्हा मजकूर सांगून दुसऱ्या सेक्रेटरीला बेशुद्ध पाडतात.

**सिंधूताई :** अगबाई ! म्हणजे एका दिवसांत ते रहस्यकथा लिहितात तरी किती ?

**कुंदा :** तीन तरी लिहीत असावेत.

**सिंधूताई :** आणि त्यांच्या प्रत्येक रहस्यकथेंत निदान पांच तरी खून असतात. म्हणजे दिवसाला ते पंधरा खून पाडतात. केवढी कर्तबगारी ही ! आणि बरें का कुंदा, त्यांच्या रहस्यकथातलें खुनाचें वर्णन वाचून मला वाटायला लागलें आहे कीं, आपलाही एखाद्या रात्रीं खून व्हावा आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती बातमी आपण वर्तमानपत्रांत वाचावी.

**कुंदा :** पण आई, तुझा खून कशाला करणार आहे कोण ?

**सिंधूताई :** हो, खरंच तें ! माझें का आतां वय राहिलें आहे खून व्हायचें ? पण न का होईना खून. निदान रहस्यकथात तरी खुनांचीं वर्णनें मला वाचायला मिळतात, हें काय थोडें झालें ! बेगुमानाची मेहेरबानी दुसरें काय !

**कुंदा :** खरें सांगूं आई ? माझें किनई...... इश्श !

**सिंधूताई :** लाजायला काय झालें ? एखादी रहस्यकथा लिहिली आहेस कीं काय तूं ? माझ्याही डोक्यांत गडे रहस्यकथेचें एक कथानक फार दिवस घोळतंय्. पण मला कळत नाहीं कीं त्यांत नायिकेचा खून करावा कीं नायकाचा ?

**कुंदा :** ती रहस्यकथा राहूं दे ग तुझी. फार दिवस मीं ऐकतें आहे तिच्याविषयीं. मी असें सांगत होतें कीं, माझें बेगुमानांच्यावर प्रेम बसलें आहे. आणि त्यांना बघण्याकरितां तुला मुद्दाम आज येथें आणलें आहे.

**सिंधूताई :** आँ ? मूर्ख पोरी! बेगुमानांच्यावर प्रेम! उद्यां एखादी कोंबडी सिंहाच्या आयाळीवर चोंच मारून म्हणाली कीं 'वनराजा, माझें तुझ्यावर प्रेम आहे' तर कसें दिसेल तें ?

**कुंदा :** तें मला कळतें ग ! पण माझा नाइलाज आहे.

**सिंधूताई :** पोरी, असा वेडेपणा करूं नको. कुठल्यातरी एखाद्या चारचौघासारख्या तरुणाशीं लग्न करून टाक.

**कुंदा :** तसलीं कित्येक पोरें माझ्या मागें असतात. लोचटासारखीं पुढें पुढें करीत असतात. पण मला त्यांतला कोणीच आवडत नाहीं. हवा गेलेल्या सोडावॉटरसारखे वाटतात मला ते तरुण ......

[ धावत, ओरडत बन्या भिंतीमागून पुढें येतो. ]

**बन्या :** धावा ! धावा ! खून ! खून !

**कुंदा व सिंधूताई :** अगबाई !

[ बन्या अडखळून पडतो. त्याच्या हातांतला चाकू दूर जाऊन पडतो. ]

**सिंधूताई :** आं ! हा कोण ग बाई ? आणि असा किंचाळतोय आणि धडपडतोय कशाला ?

**कुंदा :** दिसतोय तर सर्कशींतल्या विदूषकासारखा. आपल्या गांवांत सर्कस तर नाहीं आली एखादी नवीन ?

**बन्या :** चाकू ! चाकू ! माझा चाकू कुठें आहे ?

**कुंदा :** चाकू होय ? हं, हा घ्या.

**सिंधूताई :** आणि एवढा मोठा चाकू असा उघडा जवळ ठेवूं नये. बोटबीट कापायचें एखाद्या वेळेस.

**कुंदा :** आणि काय हो ? खून, खून म्हणून कशाला ओरडत होता ? कोण खून करणार होतें तुमचा ?

**बन्या :** माझा खून ? छे, माझा खून नाहीं करीत कोणी ! मीच खून करणार आहे तुमचा. ह्या चाकूनें करणार आहे खून.

**कुंदा** : काय ? ह्या चाकूनें ? आणि खून ? अयाई ग ! मेलें ! मेलें !

**सिंधूताई** : खरेंच खून करणार तुम्ही ?

**बन्या** : खरेंच म्हणजे ? थट्टा वाटली कीं काय तुम्हांला ? तिखटमीठ लावून खाण्याकरितां काकडीच्या चार फोडी करतात ना, तशा मी एकेकीच्या फोडी करणार आहे ह्या चाकूनें.

**सिंधूताई** : अय्या ! म्हणजे आमचा हृदयद्रावक आणि शोचनीय मृत्यु होणार म्हणायचा.

**बन्या** : अलबत ! बोला कोणाला आधीं मारूं तें ?

**सिंधूताई** : मला, मला मारा आधीं. माझी कीं नाहीं फार दिवसांची हौस आहे खून करून घ्यायची.

**बन्या** : आ ! खून करून घ्यायची हौस आहे तुम्हांला ? माणूस आहांत कीं भूत आहांत तुम्ही ?

**कुंदा** : आणि का हो, निरपराधी माणसांचे गळे कापायला निघालेले तुम्ही तरी माणूस म्हणून घ्यायला पात्र आहांत काय ?

**बन्या** : पण मी माणूस कुठें आहे ? मी तर चोर आहे. दिसत नाहीं माझ्या कपड्यांवरून ?

**सिंधूताई** : तुमच्या कपड्यावरून तर तुम्ही सर्कशींतले विदूषक आहांत असं वाटतंय्.

**बन्या** : काय ? माझी थट्टा करताय् तुम्ही ? चोराची थट्टा ? रागावलों तर खून करीन मी तुमचा.

**कुंदा** : खून तर करणारच आहांत तुम्ही.

**बन्या** : तर मग मी खून न करतांच रागारागानें निघून जाईन.

**सिंधूताई** : असें पाहा चोरसाहेब, असे रागावूं नका. त्या पोरीला काय समजतंय्. तुम्ही माझी एवढी हौस पुरवा.

**कुंदा** : तुझें डोकें बिकें फिरलंय् कीं काय आई ? आणि का हो मिस्टर चोर, तुम्ही आमचा काय म्हणून खून करणार आहांत ?

**सिंधूताई :** खरेंच ! खून करायचा म्हणजे कांहींतरी हेतु लागतो. काय हेतु आहे तुमचा आम्हांला मारण्यांत ?

**बन्या :** हेतु ? नाहीं बुवा. माझा काहीं नाहीं हेतु. कां ? खून करायला हेतु लागतोच म्हणतां ?

**सिंधूताई :** अलबत्! हेतु असल्याशिवाय खून होऊंच शकत नाहीं. मीं बेगुमानांच्या पांचशें रहस्यकथा वाचल्या आहेत आतापर्यंत. पण एकाही रहस्यकथेंत हेतूशिवाय खून झालेला नाहीं.

**बन्या :** काय ? पांचशें रहस्यकथा वाचल्या आहेत तुम्हीं ? मीं तर अजून एकही वाचलेली नाहीं.

**सिंधूताई :** मग मी साफ सांगतें कीं, चोर व्हायला तुम्ही एकदम नालायक आहांत.

**बन्या :** खरें आहे बुवा. मलाही तुमच्यासारखेंच वाटायला लागलें आहे. मला वाटतें कीं, माझ्यापेक्षां तुम्हीच खून अधिक चांगल्या प्रकारें करूं शकाल.

**सिंधूताई :** तो चाकू इकडे दिलात तर छानपैकीं खून करून दाखवीन मी.

**कुंदा :** घे, घे आई तो चाकू हिसकून.

**बन्या :** हां ! असल्या हिकमतींनीं मी फसणार नाहीं. चला, व्हा मरणाला तयार.

**कुंदा :** अयाई ग !

**सिंधूताई :** पण पहिल्यानें हेतु सांगा ना तुमचा.

**बन्या :** हेतु ! हेतु ! कठीण आहे बुवा ! राजा ! ए राजा ! ह्यांचा खून करण्यांत माझा काय हेतु आहे ?

**कुंदा :** राजा ? कोण राजा ? हें नांव माहितीचं वाटतंय मला. हे गृहस्थ इथें जवळच लपून बसले आहेत वाटतें ? पाहिलेंच पाहिजे मला.

**बन्या :** खबरदार जागच्या हाललांत तर. आणि हें पाहा, माझा खून करण्यांत हेतुबितु कांहीं नाहीं. सहज गंमत म्हणून मी खून करणार आहें.

**कुंदा :** सहज ? गमतीनें ? मला हें सगळेंच संशयास्पद वाटायला लागलें आहे.

**बन्या :** संशयास्पद काय आहे त्याच्यात ? आज सकाळीं जेवण झालें जरा जास्त. त्यामुळें दुपारीं चांगली लांबलचक झोप काढली. आणि संध्याकाळीं जागा झालों तेव्हां म्हटलें 'चला, जरा फिरायला जाऊं आणि गंमत म्हणून एखादा खून करून घरीं येऊं.'

**कुंदा :** चोरदादा, तुमच्या डोळयांवरची ती पट्टी जरा दूर करतां का ?

**बन्या :** हां ! आतां तुम्ही फार शहाणपणा करायला लागलांत. तें कांहीं नाहीं. आतां हा चाकू ... ( चाकू उगारतो. )

**कुंदा :** डाकू माणसा ...

**बन्या :** डाकू ! चाकू आणि डाकू. चाकू कीं डाकू. बरोबर हाच प्रश्न माझ्या डोक्यांत घोळतो आहे.

**कुंदा :** डाकू कीं चाकू ? हें काय बडबडताय् तुम्ही ?

**सिंधूताई :** तुला नाहीं समजायचें तें कुंदा, पण मला समजलें बरोबर.

**बन्या :** काय म्हणता ? आलें तुमच्या ध्यानांत ? शब्दकोडीं सोडवायचा नाद आहे का तुम्हांला ?

**सिंधूताई :** नाद कसला, वेडच आहे मला शब्दकोड्यांचें. मी जेव्हां शब्दकोडें सोडवत नसतें तेव्हां रहस्यकथा वाचत असतें आणि रहस्यकथा वाचत नसतें तेव्हां शब्दकोडें सोडवत असतें.

**बन्या :** मग कोडें नंबर २३९ सोडवलें आहे का तुम्हीं ?

**सिंधूताई :** हो तर. माझें उत्तर इथेंच पर्समध्यें आहे माझ्या.

**बन्या :** माझें उत्तर पण आहे माझ्याजवळ. चला, आपण उत्तरांची तुलना करूं या. ( कुंदास ) हा चाकू धरा हो जरा माझा.

**सिंधूताई :** मला वाटतें कीं, चाकूपेक्षां डाकूच अधिक बरोबर आहे.

**बन्या :** पण मी म्हणतों कां ? चाकू कां बरोबर नाहीं ?

**कुंदा :** मूर्ख माणसा, आतां मीच दाखवतें तुला चाकू बरोबर आहे कीं नाहीं तें.

**बन्या :** अरे बाप रे ! ओय् ! ओय् ! ए राजा ! अरे मेलों, मेलों ! धावा, धावा !

**राजा** : ( भिंतीमागून बाहेर पडून मोठ्यानें ओरडत बाहेर पळूं लागतो. ) धावा ! धावा ! बन्या मेला ! बन्याचा खून झाला. धावा ! धावा !

[ विंगजवळ राजाची मानगूट बेगुमान् पकडतात. बेगुमान् हे मध्यम वयाचे गृहस्थ ; फ्रँकेस्टाइनसारखें दिसण्याचा प्रयत्न. ]

**बेगुमान्** : ( पुढें होत ) खामोष !

**राजा** : बरें ! बरें ! खामोष, खामोष.

**कुंदा** : आं ! काय झालें तरी काय ?

**राजा** : कुठें काय झालें ? हे खामोष म्हणाले, म्हणून मी देखील खामोष म्हणालों.

**कुंदा** : तुम्ही ? तरी मला मघांपासून संशय येतच होता कीं, तुम्ही ह्या कारस्थानामागें असणार म्हणून. काय बेत होता तुमचा ?

**राजा** : बेत कसला ? म्हटलें आपली तुमची जरा करमणूक करावी.

**कुंदा** : करमणूक होय ? आतां पोलिसला बोलावून तुम्हांला जरा गंमत दाखवूं का ?

**बन्या** : अहो, जरा हळू. तो चाकू टोचतोय् मला. राजा, यांची वीरश्री वाढेल असें कांहीं बोलूं नको बाबा. नाहीं तर माझी येथें इतिश्री व्हायची.

**बेगुमान्** : खामोष !

**कुंदा** : अगबाई ! हे कोण ?

**राजा** : कांहीं कळत नाहीं बुवा. राम जसा एकवचनी होता तसे हे एकशब्दी गृहस्थ दिसताहेत.

**सिंधूताई** : मला वाटतं हे खुद्द बेगुमान् असावेत.

**बन्या** : अरे बाप रे !

**बेगुमान्** : होय, मी बेगुमानच. तळघरांतलें रहस्य, पहिल्या मजल्यावरचें गुपित, दुसऱ्या मजल्यावरची भानगड ... वगैरे पांचशें पुस्तकांचा कर्ता.

**राजा** : कर्म माझें. करायला गेलों एक आणि झालें दुसरेंच.

**कुंदा :** अय्या ! बेगुमान् ! तुम्ही येथें कसे ?

**बेगुमान्:** मी ह्या भुताटकीनें पछाडलेल्या घरावर एक रहस्यकथा लिहितों आहे. तेव्हां वातावरणाचा अभ्यास करण्याकरितां मुद्दाम या घरात येऊन बसलों होतों.

**सिंधूताई :** मला तुमच्या सगळ्या पुस्तकांचीं नांवें पाठ आहेत. म्हणून दाखवूं ? तिसऱ्या मजल्यावरचें गूढ, चौथ्या मजल्यावरचें कूट ...

**राजा :** पुरे पुरे ! एवढे मजले चढून धाप लागली ना मला. आणि शिवाय मला असा संशय यायला लागला आहे कीं, ह्यांचा अगदीं वरचा मजला रिकामाच असावा.

**कुंदा :** मोठ्या माणसाची अशी थट्टा करायला लाज नाहीं वाटत तुम्हाला ? बेगुमान् , मनावर घेऊं नका हो तुम्ही ह्या माणसाचें बोलणें.

**बेगुमान् :** थांबा ! मी निरीक्षण करतों आहे.

**सिंधूताई :** पाहा ग कुंदा. बेगुमान् निरीक्षण करीत आहेत.

**राजा :** निरीक्षण ! मला वाटतंय् कीं काटा चमचा घेऊन हे आतां मला खायला लागणार आहेत.

**कुंदा :** आणि पाहिलंस का आई ? निरीक्षण करतांना त्याचे दोन्ही डोळे उघडे आहेत.

**बन्या :** तोंड उघडूं का ? म्हणजे दात मोजतां येतील.

**बेगुमान् :** नाहीं. कांहीं गरज नाहीं. आतां फक्त तुमच्या पावलांचे ठसे घ्यायचे राहिले.

**राजा :** असं वाटतंय् कीं, माझ्या पायाचा ठसा याच्या पृष्ठभागावर उमटवावा.

**बेगुमान् :** खामोष ! मूर्ख माणसा, मीं तुला नुसतें गदगदां हलवलें तरी तुझे सगळे दांत पडून बोलणें अशक्य होऊन जाईल.

**बन्या :** राजा, काहींतरी मूर्खासारखें बोलून आधींच बिकट असलेली परिस्थिति अधिक बिकट करूं नको.

**राजा :** बन्या, तूं तुरुंगांत गेलास तरी हरकत नाहीं. पण ह्या माणसापुढें मी कदापि पड खाणार नाहीं.

**बन्या :** राजा, तुझ्याकरितां मीं भानगड अंगावर ओढवून घेतली आणि आतां तूं सरळ मला तुरुंगांत पाठवायला निघाला आहेस काय ?

**राजा :** माफ कर बन्या, पण प्रेमाचा प्रश्न आला म्हणजे मी असाच बेदरकार होतों.

**बेगुमान् :** बस् ! झालें माझें निरीक्षण.

**राजा :** का हो, इतक्यांत झालें ? अजून माझ्या नाकातले केस आणि कानांतला मळ नाहीं पाहिलांत तुम्हीं.

**बेगुमान् :** निरीक्षणावरून मीं असा निष्कर्ष काढला कीं, ह्या दोन गुंडानीं तुम्हा दोघींना पळवून न्यायच्या हेतूनें तुमच्यावर हल्ला केला असावा, आणि तुम्हीं शौर्यानें त्यांचा बेत हाणून पाडला असावा.

**सिंधूताई :** खरेंच का हो तुम्ही मला पळवून नेणार होतात ?

**बन्या :** छे हो, भलतेंच. तुम्हाला पळवून न्यायला काय मला वेड लागलंय् कीं काय ?

**बेगुमान् :** त्याच्या बोलण्याकडे तुम्हीं लक्ष देऊं नका. माझें निरीक्षण कधींच चुकायचें नाहीं. आणि असें पाहा मिस् ......

**कुंदा :** कुंदा देशमुख.

**बन्या :** ( ओरडतो ) बन्याजी सरंजामे.

**राजा :** राजाभाऊ धडपडे.

**बेगुमान् :** खामोष !

**कुंदा :** तुम्हांला नव्हतें कोणी आपलें नांव विचारलें.

**बन्या :** सॉरी, सॉरी.

**राजा :** मला वाटलें कीं सगळ्यांनीं आपापलीं नावें सांगायचीं.

**बेगुमान :** मिस् कुंदा देशमुख ! आज ह्या झटापटींत तुम्हीं जें शौर्य दाखवलेंत त्याचें मला कौतुक वाटतें. आधुनिक तरुणींच्या दौर्बल्यामुळें मी अलीकडे उन्मनस्क झालेला होतों. पण आपल्यांतली ही पृथगात्मता आणि अस्मिता पाहून ...

**सिंधूताई** : पृथगात्मता म्हणजे कॅन्सरसारखा एखादा रोग आहे वाटतें ?

**राजा** : हो ना ! साहित्यिकानां तो विशेष प्रमाणांत होतो.

**कुंदा** : आतां चुप बसाल का तुम्ही? नका गडे बेगुमान्, माझी अशी स्तुति करून तुम्ही मला लाजवूं नका. तुमच्या रहस्यकथेच्या एका पानाइतकी देखील माझी योग्यता नाहीं.

**राजा** : साफ खोटें आहे हें. बेगुमान्, ह्यांच्यावर तुम्ही मुळींच विश्वास ठेवूं नका. अहो, हिच्या गालावर रुळणाऱ्या त्या एका कुरळ्या बटेची किंमत तुमच्या त्या सगळ्या मजलेदार रहस्यकथांहून अधिक आहे.

**बेगुमान्** : खामोष! मिस् देशमुख, हा मनुष्य फारच वाचाळ दिसतो. सारखें बेट्याचें तोंड चालू असतें. आता मीं ह्याचें निरीक्षण केलें तेव्हां मला असें आढळून आलें कीं, ह्याच्या कोटाला बटनें नाहीत. मला वाटतें कीं, जेव्हां हा बोलत नसेल तेव्हां आपल्या कोटाचीं बटनें चावून आपलें तोंड चालू ठेवत असावा. ह्याची सायकॉलॉजीच अशा प्रकारची दिसते.

**कुंदा** : कित्ती सूक्ष्म निरीक्षण आहे तुमचें बेगुमान्.

**राजा** : अरे वा रे सूक्ष्म निरीक्षण ! माझें निरीक्षण असें आहे कीं, ह्या गृहस्थाच्या बरोबर ज्याअर्थी त्याचे तीर्थरूप नाहींत, त्याअर्थी त्यानीं आपल्या तीर्थरूपांना खाऊन टाकलें असावें.

**बेगुमान्** : खामोष ! चटणी करून टाकीन जास्त बोललास तर.

**राजा** : तुमच्या बोलण्यामुळें माझ्या विधानाला पुष्टीच मिळते. आणि असेंही सिद्ध होतें कीं, तुम्हीं आपल्या तीर्थरूपांची चटणी करून खाल्ली असावी.

**बन्या** : राजा, राजा, काय अफाट बुद्धिमत्ता आहे रे तुझी.

**सिंधूताई** : मला सुद्धां वाटतें कीं, हे बेगुमानांच्या इतके हुषार आहेत.

**कुंदा** : कांहींतरीच काय बोलतेस आई ! नुसती बटबट केली तर काय त्यामुळें माणूस शहाणा ठरतो? ह्यांनीं का बेगुमानांच्यासारखें लिहिलें आहे, का धाडसी कृत्यें केलीं आहेत ?

**राजा** : बेगुमानांनीं माझी मानगूट सोडली तर आत्तां मी फार मोठें धाडसी कृत्य करून दाखवायला तयार आहें.

**कुंदा** : कुठचें तें ?

**राजा** : तुमचा हात धरून तुमचं ...

**कुंदा** : इश्श !

**बेगुमान्** : खामोष ! मला वाटतें आपण आतां ह्या दोन्ही गुंडांना पोलिसांच्या हवालीं करावें.

**बन्या** : नको, नको. बेगुमान्, ह्यांत माझा कांहीं दोष नाहीं. ह्या राजानें मला हा मूर्खपणा करायला लावला. नेहमीं तो मला असा संकटात लोटत असतो.

**कुंदा** : जाऊं दे गडे बेगुमान् ! मला ह्या दोघांची दया येते आहे.

**सिंधूताई** : नको कसें ? द्या हो ह्यांना पोलिसांत आणि त्यांच्याबरोबर मलाही करा पोलिसांच्या हवालीं. मला तुरुंगांतले चोर आणि दरोडेखोर पाहायचे आहेत.

**बेगुमान्** : गुन्हेगारांना शासन हें झालेंच पाहिजे. रहस्यकथेचें हे मूलभूत तंत्र आहे. 'रहस्यकथा कशा लिहाव्यात' ह्या माझ्या पुस्तकात मीं तें लिहूनच ठेवलेलें आहे.

**कुंदा** : मग गडे तुम्हीच ह्यांना थोडेंसें शासन करा आणि द्या सोडून बापड्यांना. बिचारे !

**राजा** : पाहिलेंस बन्या ! आत्तांच ह्यांना माझी दया वाटायला लागली आहे. उद्या सहानुभूति वाटेल. परवां सहसंवेदना होतील. आणि त्यानंतर प्रीतीचा दिव्य अनुभव येईल. प्रेमाची लिफ्ट ही अशीच वरवर जात असते.

**बेगुमान्** : खामोष ! प्रेमाची लिफ्ट कशी असते तें समजण्यापेक्षां पोलिसांची गचांडी कशी असते तें समजून घ्यायलाच तूं अधिक लायक आहेस. पण ह्या शूर तरुणीची इच्छा आहे म्हणून मी तुम्हांला यावेळीं फक्त एवढ्यावरच सोडतों — (बेगुमान् ठोसे मारतात.)

**बन्या** : ओयू ! ओयू ! (पडतो.)

**राजा** : आई गऽऽ ! (पडतो.)

**सिंधूताई :** (हनुवटी पुढें काढून) आणि आतां मला.

**कुंदा :** बिच्चारे !

**बेगुमान् :** आतां असंच करूं या–ह्या दोघांना आपण पाठीला पाठ लावून उभे करूं या आणि ह्या दोरीनें बांधून ठेवूं या.

[ सिंधूताई आणि बेगुमान् त्या दोघांना बांधतात. ]

**कुंदा :** जरा हळू बांधा हो त्यांना.

**बेगुमान् :** मिस् कुंदा ! तुम्ही जशा शूर आहात तसें तुमचें हृदय कोमल आहे हें पाहून मला आनंद झाला. माझ्या पुढच्या रहस्यकथेंत मी तुम्हालाच नायिका करणार आहें.

**कुंदा :** इश्श ! किती स्तुति कराल तुम्ही माझी बेगुमान् ! मला किनई तुमच्याशीं खूप खूप बोलायचें आहे.

**सिंधूताई :** आणि मलाही तुम्हाला रहस्यकथेचें एक कथानक सांगायचें आहे. खूप दिवस माझ्या डोक्यात घोळतंय् तें.

**बेगुमान् :** चला ! आतां आपण कुठे तरी जाऊन चहा घेऊं.

**कुंदा :** ( मागें वळून ) बिच्चारे !

[ बेगुमान् व कुंदा चालूं लागतात. सिंधूताई मध्येंच मागें वळून बन्याचे नाक ओढतात आणि पळत पळत जातात. ]

**राजा :** बन्या, मी उडत उडत उंच कुठें तरी जातोंय असं वाटतंय मला.

**बन्या :** आणि मला वाटतंय कीं, मी एका खोल विहिरींत पडतों आहे.

**राजा :** माझें डोकें असें भिंगरीसारखें फिरतंय; मग बन्या, तूं रे कसा मला दिसत नाहींस ?

**बन्या :** राजा, गाढवा, तुझें तोंड देखील पाहायची मला इच्छा नाहीं. तुझ्यामुळें माझ्यावर हा प्रसंग ओढवला.

**राजा :** मित्रा, असा निराश होऊं नकोस. ह्या परिस्थितींत देखील भविष्यकाळ उज्ज्वल आहे हें विसरूं नकोस. जगांतले सगळे महान् पुढारी जनतेला हेंच कंठशोष करून सांगत असतात. महाराष्ट्रांतले थोर टीकाकार

आणि प्रतिभाशाली लेखक हेंच सांगत असतात कीं, माणसानें आशावादी असावें. साहित्यात आशावाद असावा.

**बन्या :** मूर्खा ! डोळ्यांपुढची अंधेरी अजून गेली नाहीं आणि तुला आशावाद सुचतोय् काय ? बदमाश लेकाचा. माझ्यावर असा प्रसंग आणून पुन्हा दुःखावर डागण्या देतो आहेस आणखी ?

**राजा :** हां ! हां ! बदमाश वगैरे शब्द वापरूं नको. माणसानें नेहमीं मांगल्याचे पूजक असावें. महाराष्ट्रांतले महान् टीकाकार ...

**बन्या :** मरोत ते टीकाकार. मांगल्याचें पूजन राहिलें बाजूला, पण तुझी मात्र खेटरानें पूजा करावी असं मला वाटतंय्.

**राजा :** बोलून घे मित्रा, बोलून घे. पण आठ दिवसाच्या आत मी कुंदाशीं तर लग्न ठरवीनच, पण तुझ्या जागेची देखील सोय करीन. हा राजा म्हणजे आशावादाची ज्योत आहे. धैर्याचा मेरू पर्वत आहे.

[ कुत्रें भुंकतें. मग दुसरें भुंकतें. मग तिसरें. ... मग पांचवें. ]

बाप रे ! एक कुत्रें येतें आहे आपल्या अंगावर धावून. बन्या, वाचव मला.

**बन्या :** अरे बाप रे, दुसरें !

**राजा :** तिसरें, चवथें, कुत्र्याची फौजच धावून येतेय् कीं रे आपल्या अंगावर. मेलों, मेलों ! धावा, धावा !

**बन्या :** बा आशेच्या पलित्या, धैर्याच्या मेरू पर्वता, असा कोसळूं नको. निदान मला पाडूं नको. ओय् ! ओय् !

[ राजा पडतो आणि बन्याही कोसळतो. पडदा पडतो. ]

# २



[ स्थळ : कुंदाच्या घराची बाहेरची खोली. कुठच्याही मध्यम-वर्गीयाच्या घराची असते तशीच सजावट. मात्र नाट्यप्रयोगाच्या दृष्टीनें खोलीला एक खिडकी असणे आणि खोलींत एक मोठीशी खुंटी व रहस्यकथांचा ढिगारा असणें आवश्यक आहे. खोलीची खिडकी उघडते आणि बन्या आत डोकावतो. ]

**बन्या** : ए ! शुत् ! मंदा ! अग खिडकी उघडीच आहे घराची. चल, आपण आंत जाऊन पाहूं या.

[ खिडकींत मंदाचें डोकें दिसूं लागतें. मंदा ही बन्याची प्रेयसी. रूपानें चारचौघींसारखी. स्वभावानें साधीभोळी. ]

**मंदा** : पण असें एखाद्या घरांत चोरून मारून शिरणें बरें का ?

**बन्या** : चोरून मारून म्हणजे ? आपलेंच घर आहे हें. चल, ये आत. समर्थांनींच म्हटलें आहे ना कीं, मना श्रेष्ठ धारिष्ट्र चित्तीं धरावें.

[ बन्या उडी मारून आंत प्रवेश करतो. ]

**मंदा** : त्याचा अर्थ असा कीं, धैर्यबिर्य काय असेल तें मनांत ठेवावें. चारचौघांत व्यवहारांत तें दाखवूं नये.

**बन्या** : वा ! शहाणीच आहेस मोठी. उद्या म्हणशील कीं, प्रेमदेखील आपलें मनांतल्या मनांत ठेवावें. चल, ये आंत.

[ बन्या तिला ओढतो. ती खिडकींतून आंत येते. ]

**मंदा** : अगबाई ! ह्या घरांत तर सामान बिमान दिसतंय. इथें राहतें वाटतें कोणी ! तरी मी सांगत होतें कीं, असें खिडकींतून घरांत शिरणें बरें नाहीं.

**बन्या :** अशी घाबरतेस काय? मी आहें ना तुझ्याबरोबर. कोणीही आलें तरी त्याचा समाचार घ्यायची ताकद आहे माझ्या अंगांत. परवां तो सुप्रसिद्ध रहस्यकथाकार बेगुमान् आहे ना, त्याची आणि माझी जुंपली तेव्हां असा एक ठोसा ठेऊन दिलायू हनुवटीवर. कोळशाच्या पोत्यासारखा खालीं कोसळला.

**मंदा :** हे बिचारे बेगुमान् फारच लोकांच्याकडून मार खाताहेत असं दिसतंय.

**बन्या :** म्हणजे? आणखी कोणीं मारलें त्याना?

**मंदा :** मी असें ऐकलें कीं, बेगुमान् चाकू घेऊन एका मुलीवर हल्ला करीत होते. तेव्हां राजा धडपडे नावाच्या तरुणानें त्यांना असेंच हनुवटीवर ठोसा देऊन खालीं पाडलें. आणि मग एका झाडाच्या फांदीला उलटें टांगून ठेवलें.

**बन्या :** काय बदमाष आहे लेकाचा हा राजा.

**मंदा :** तुम्ही ओळखतां वाटतें त्याना?

**बन्या :** अग माझा चांगला मित्र आहे तो.

**मंदा :** मग असल्या बदमाष माणसाशीं मैत्री कशी ठेवता हो तुम्ही?

**बन्या :** बदमाष म्हणजे खोटारडा. एरवीं तसा तो चांगला मनुष्य आहे, पण खोटें मात्र फार बोलतो हं. आतां ह्याच बाबतींत पाहा ना, माझी बेगुमान्शीं जुंपली तेव्हां तो माझ्याबरोबरच होता. पण माझ्या मदतीला येण्याऐवजीं तो बेटा पळत सुटला.

**मंदा :** पण मीं तर असें ऐकलें कीं, त्या राजा धडपडेचा एक मित्र असाच त्याला एकटा सोडून पळून गेला.

**बन्या :** म्हणजे? मी पळून गेलों अशी गप् उठवली आहे कीं काय ह्या राजानें? काय महाभयंकर थापाड्या मनुष्य आहे हा. आतां भेटूं दे तर खरा, मानगुटच धरतो गुलामाची.

**मंदा :** जाऊं द्या हो. पुरुष हे असेच थापा मारीत असतात.

**बन्या :** ऑं ! मलाही थापाड्या समजतेस कीं काय तूं ?

**मंदा :** छे ! कधीं कधीं तुमच्या मनांत खरें काय आणि खोटें काय ह्याचा घोटाळा होतो इतकेंच.

**बन्या :** इतकेंच ना ? मग हरकत नाहीं.

**मंदा :** ही सगळी जागा आपल्याला मिळायची का हो ?

**बन्या :** नाहीं, फक्त एकच खोली मिळणार आपल्याला.

**मंदा :** एवढी पुरे झाली. एवढ्या जागेंत मी कसा छान संसार थाटीन.

**बन्या :** आहा ! संसार ! संपलें ते ब्रह्मचर्य, तें कोळशाच्या पोत्याच्या शेजारीं झोपणें, तें पोरींच्याकडे बघून सुस्कारे सोडणें.

**मंदा :** संपणार म्हणायचें तें सगळें एकदा. अहो, लग्न झालेली एखादी मैत्रीण भेटली तर कध्धीं आपल्या नवऱ्याची ओळख करून देत नसे.

**बन्या :** आणि माझा एकही लग्न झालेला मित्र मला कधीं घरीं जेवायला बोलवत नसे. आपण मात्र बायकोनें केलेला शिरा, लोणी थालीपीठ, खीरपुरी— आणि खिरींत बेदाणा बरं का—असले जिन्नस खाऊन चांगलें गुबगुबीत व्हायचें, आणि वर आम्हांला म्हणायचें 'चैन आहे बुवा तुमची. No responsibility. Enjoy करून घ्या लेको. लग्न झाल्यावर नाहीं मिळायची मजा करायला.'

**मंदा :** असे रागावूं नका. आतां मी तुम्हाला खूप खायला करून घालत जाईन.

**बन्या :** घालीन म्हणजे ? घातलेंच पाहिजे. त्या बाबतींत मीं एक योजनाच आखून ठेवली आहे. सकाळीं उठल्यावर चहा आणि ब्रेडबटर, मग थोड्या वेळानें हातावर एक कोहाळ्याची वडी, मग थोड्या वेळानें पुन्हा चहा आणि बरोबर शिरा नाहींतर भजीं. त्यानंतर मध्येंच डब्यांत हात घालून काजू नाहींतर खजूर खायचा आणि मग आंघोळ करून जेवण.

**मंदा :** अग बाई ! बाई ! बाई ! मग माझ्याऐवजीं तुम्हीं एखाद्या धष्टपुष्ट आचाऱ्याशींच लग्न केलेंत तर अधिक बरें होईल.

**बन्या :** अग, नाहीं कांहीं खायला दिलेंस तरी चालेल. तूं असलीस म्हणजे पुष्कळ झालें. तूंच माझी कोहाळ्याची वडी, आणि तूंच तिखट-मिठाचा शिरा.

**मंदा :** इश्श ! असा चावटपणा नाहीं गडे करायचा.

**बन्या :** वा ! लग्न म्हटलें म्हणजे ह्याहूनही भयंकर चावटपणा असतो.

**मंदा :** कांहींतरीच काय गडे.

**बन्या :** (हंसतो) आपण आज फार खुशींत आहों बुवा ! स्वतःची जागा असली म्हणजे माणसांत आश्चर्यकारक फरक पडतो. माणूस मान ताठ करून चालूं लागतो. कोणाच्याही पाठीवर थाप मारून त्याची चौकशी करावी असें वाटूं लागतें. असें वाटतें कीं, सगळ्यांचीं लग्नें व्हावींत आणि सगळ्यांनीं अगदीं आनंदानें संसार करावा.

**मंदा :** पण काहीं लोकांचीं लग्नें आधींच झालेलीं आहेत.

**बन्या :** झालीं आहेत ? कां झालीं आहेत ?

**मंदा :** आतां मला काय माहीत ?

**बन्या :** बरें ! बरें ! होऊं देत. मीं म्हणतों कीं, त्यांनीं पुन्हा एकदा लग्नें करावींत.

**मंदा :** मीं तर ठरवलें आहे कीं, लग्न झाल्यावर माझे तीन सख्खे भाऊ, दोन चुलत भाऊ आणि एक मामा ह्या सगळ्यांना आपल्याकडे जागा द्यायची. फार हाल होताहेत सध्यां बिचाऱ्यांचे.

**बन्या :** 'मला वाटतें कीं, इतका व्यापक दृष्टिकोन ठेऊन आपलें भागणार नाहीं. पण त्याचा विचार आपण नंतर करूं. आतां मुख्य प्रश्न असा आहे कीं, लग्न कधीं करायचें ?

**मंदा :** करूं कीं.

**बन्या :** पण केव्हां ?

**मंदा :** एवढी उतावीळ काय लागली आहे ?

**बन्या :** म्हणे उतावीळ, मग काय आपल्या लग्नाची पंचवार्षिक योजना आंखावी असें तुझें म्हणणें आहे ?

**मंदा :** पण आधीं ही जागा कोणाची आणि आपल्याला कशी मिळणार तें सांगा.

**बन्या :** ही जागा कुंदा देशमुख नांवाच्या मुलीची आहे.

**मंदा :** कुंदा देशमुख ? तिचा आणि तुमचा काय संबंध ?

**बन्या :** छे ! छे ! तिचा आणि माझा कांहींही संबंध नाहीं. पण माझ्या एका मित्राचा आणि तिचा मात्र शरीरसंबंध जुळणार आहे. त्यांचें लग्न झालें कीं तो येथेंच राहायला येणार आहे. आणि येथें राहायला आल्यावर ह्या जागेंतली एक खोली तो आपल्याला राहायला देणार आहे.

**मंदा :** बरेंच गुंतागुंतीचें दिसतंय् सगळें. आणि त्यानें जागा द्यायचें कबूल केलें असलें तरी तिनें केलें आहे का ?

**बन्या :** त्यानें कबूल केल्यावर तिच्या संमतीची गरज काय ?

**मंदा :** लग्न झाल्यावर त्याच्या कबुलीपेक्षां तिच्या संमतीलाच अधिक महत्व असतें. एवढें कसें कळत नाहीं तुम्हांला ?

**बन्या :** नाहीं, ही पुरुष जातीची बदनामी मी कदापि ऐकून घेणार नाहीं.

**मंदा :** बऽऽरें बाई ! पण ह्या तुमच्या मित्राचें नांव तरी काय ?

**बन्या :** राजा धडपडे. फार जुना दोस्त आहे माझा तो.

**मंदा :** तुम्हीं मघाशीं ज्याला खोटारडा आणि बदमाष म्हणत होतां, तोच ना हा गृहस्थ ? मग त्याच्यावर विश्वास कसा ठेवलात तुम्हीं ?

**बन्या :** तसा तो मनुष्य कांहीं वाईट नाहीं. आणि एकदा त्यानें एक गोष्ट मनांत घेतली कीं तो तिचा पिच्छा सोडीत नाहीं.

**मंदा :** मला हें सगळेंच संशयास्पद वाटतंय्. (दाराचें कुलुप वाजल्याचा आवाज) आलीं वाटतें तीं माणसें घरीं ?

**बन्या :** येऊं देत, येऊं देत. आपण त्यांना चांगला आश्चर्याचा धक्का देऊं.

[ कुंदा आणि तिची आई प्रवेश करतात. ]

**कुंदा** : तुम्ही ? आणि माझ्या घरांत ?

**बन्या** : हॅ हॅ हॅ ! मला वाटलेंच होतें तुम्हांला आश्चर्य वाटेल म्हणून.

**कुंदा** : आणि ह्या कोण ?

**बन्या** : ही मंदा. हिच्याशीं माझें लग्न होणार आहे.

**कुंदा** : मग इथें बसून काय लग्नाचा मुहूर्त ठरवत होतां कीं काय ? कीं लग्नाचें आमंत्रण देण्याकरितां खिडकींतून यायची पद्धत पडली आहे अलीकडे ?

**मंदा** : मला उगीच बनविण्याकरितां थापा मारल्यात ना तुम्हीं ? माफ करा हं मिस् देशमुख तुमच्या जागेंत असें शिरल्याबद्दल. पुरुष काय मेले अजागळ असतात. पण बायकांनीं मूर्खपणा केला म्हणजे जास्त वाईट दिसतें.

**सिंधूताई** : बरें का कुंदा, मघांपासून मी आठवण करतें आहे, ह्या कोण त्याची. आतां आठवलें, त्या पलीकडे राधाबाई राहतात ना, त्यांची ही पुतणी.

**कुंदा** : कोण ह्या राधाबाई ?

**सिंधूताई** : वा ! राधाबाई माहीत नाहीं ? आमच्या महिलामंडळांत रहस्यकथा सांगायची चढाओढ असते ना, तिच्यांत त्यांना आणि मला पहिलें बक्षीस मिळालें.

**बन्या** : ही कसली बुवा चढाओढ असते ?

**सिंधूताई** : चढाओढ अशी कीं, दोघींनीं एकमेकांना रहस्यकथा सांगायच्या. जिच्या रहस्यकथा आधीं सांगून संपतील ती हरली. आम्हीं दोघी एकमेकींना मध्यरात्र झाली तरी रहस्यकथा सांगतच होतों. अखेर परीक्षक बायका जागच्या जागीं कोलमडून झोंपी गेल्या तेव्हां आम्हीं रहस्यकथा सांगायच्या थांबलों.

**बन्या** : मोठी जबरदस्त चढाओढ दिसते आहे तुमची. कां हो, ह्या रहस्यकथा तुम्हीं आळापाळीनें सांगत होतां कीं एकदमच बोलत होतां दोघी ?

**सिंधूताई** : खरें म्हटलें म्हणजे आळीपाळीनें सांगायच्या असतात. पण आम्हीं दोघी एकदमच बोलत होतों. कारण सगळ्या रहस्यकथा आम्हीं दोघींनींही वाचलेल्या होत्या.

**बन्या :** बाप रे !

**सिंधूताई :** 'बाप रे' काय ? दिवसा वाचलेल्या रहस्यकथा मी रोजच रात्रीं झोपेंत कुंदाला सांगत असतें.

**कुंदा :** आई, तूं भलतेच फाटे फोडतेस बोलण्याला. काय हो मिस्टर, माझ्या घरात तुम्ही का व कसे शिरलात ? तुम्ही पहिल्यानें भेटलात तेव्हां नुसते चोराच्या वेषात होतात. पण आतां मात्र तुम्ही खरोखरीचे चोर आहात असं वाटायला लागलंय् मला.

**बन्या :** हॅ–हॅ–हॅ ! काहींतरी गैरसमज झालेला दिसतोय् तुमचा. किंवा कदाचित् राजा तुम्हाला सांगायला विसरला असेल. पण आता मी येथें कायमचाच राहायला येणार आहे. आणि ही पण. शिवाय हिचे तीन सख्खे भाऊ, दोन चुलत भाऊ आणि एक मामा. बरोबर आहे ना ग ?

**कुंदा :** बस् इतकेच ?

**बन्या :** मग आणखी पाहुणेरावणे येतील ते निराळे.

**कुंदा :** हें पाहा, तुम्ही ढीग येणार असाल राहायला, पण मला हा विश्वकुटुंबवाद मानवायचा नाहीं.

**बन्या :** आता राजाच्या इच्छेबाहेर तुम्ही जाणार असाल तर गोष्ट निराळी.

**कुंदा :** राजा ? कोण राजा ? आणि त्याच्या इच्छेचा इथें काय संबंध ?

**बन्या :** वा ! आपण जशा काहीं त्या गावच्याच नाहीं असें दाखवताय्. पण आम्हांला कळली आहे म्हटलें बातमी.

**कुंदा :** कसली बातमी ?

**बन्या :** बातमी अशी कीं, आमच्या राजाच्या तुम्ही राणी होणार आहांत.

**कुंदा :** काय ? मी ! – आणि त्या राजा धडपडेशीं लग्न करणार ? त्यापेक्षां राजाबाई टॉवरशीं लग्न करणें मी अधिक पसंत करीन.

**बन्या :** वा ! तुम्हीच नाहीं का राजाला सांगितलेंत कीं आपला जोडा चांगला शोभतो म्हणून.

**कुंदा :** घ्या! काय जबरदस्त खोटें बोलतात हे गृहस्थ! उद्यां ते हिमालय पर्वताला असें पटवून देतील कीं, तूं दोन पैशांचें आइसफ्रूट आहेस. मीं त्याना सांगितलें कीं, माझ्या जोड्याशीं देखील मी तुम्हांला उभी करणार नाहीं. तर हे गृहस्थ सांगत सुटले कीं आमचा दोघांचा जोडा चांगला शोभेल.

**बन्या :** पण ......

**मंदा :** झाली तेवढी शोभा पुरे नाहीं का झाली? तो तुमचा मित्र एक मूर्ख, तुम्ही सात मूर्ख आणि मी दहा मूर्ख.

**बन्या :** नाहीं, नाहीं. मी दहा मूर्ख आणि तूं सात मूर्ख.

**मंदा :** पुरे झाला तुमचा आचरटपणा. ही मी चाललें. आतां लग्न नको आणि कांहीं नको. रेशनिंग ऑफिसांतली नोकरी आणि पाण्याच्या पिंपाशेजारीं झोपणें, हेंच आमचें आयुष्य. नको तीं स्वप्नें आणि तुमचें तर तोंड देखील पाहायला नको.

[ जाते. ]

**बन्या :** अग, अग असें नको करूं. ती कोहाळ्याची वडी, तो तिखटमिठाचा शिरा सगळें सगळें विसरलीस का तूं?

[ तिच्या मागोमाग जातो. ]

**कुंदा :** बिचारी! आणि हें सगळें राजा घडपडेच्या आचरटपणामुळें झालें.

**सिंधूताई :** तुला सांगायला विसरलेंच मी कुंदा. अग, तूं ऑफिसात गेल्यापासून जवळ जवळ चार पांच माणसें अशीं येऊन गेलीं. एकानें सांगितलें कीं संध्याकाळीं सात ते दहा राजा तुझ्याबरोबर सिनेमाला जाईल, त्यावेळीं हें घर वापरायची त्यानें परवानगी दिली आहे. दुसरा म्हणाला कीं राजा तुझ्याबरोबर दर रविवारीं ट्रिपला जाणार आहे, त्यावेळीं हें घर वापरायची त्यानें परवानगी दिली आहे. तिसरा म्हणाला ......

**कुंदा :-** (वेडावून) काय म्हणाला? कीं आपलें देहावसान झाल्यावर ह्या जागेची आणि माझी मालकी राजानें त्याला द्यायचें कबूल केलें आहे म्हणून? हद्द झाली ह्या राजापुढें. हा मनुष्य आहे कीं सैतान?.

**सिंधूताई** : मला वाटतें कीं तुला तो आवडत असावा. नाहींतर तूं त्याला केव्हांच झिडकारून टाकलें असतेस.

**कुंदा** : झिडकारून ? त्याला मारण्याकरितां मीं पायातली चप्पल देखील काढली होती. तर त्या निर्लज्ज माणसानें पायांतला बूट काढून म्हटलें, 'चप्पल काढायची तसदी कशाला घेतां ? ह्या बुटानेंच मारा ना.' मी सिनेमाला गेलें कीं, हा माणूस माझ्या मागोमाग तिकिट काढून माझ्या शेजारीं येऊन बसतो. मीं दुकानात जाऊन खरेदी केली कीं, हा बिल देऊन ऐटींत माझ्याबरोबर बाहेर पडतो. माझ्या ऑफिसात येऊन तो, 'लग्न झाल्यावर मला हनिमूनकरितां महिनाभर सुट्टी मिळेल का', अशी चौकशी करून गेला.

**सिंधूताई** : भलतीच चिकाटी दिसते आहे ह्या माणसाची.

**कुंदा** : चिकाटी ! परमेश्वरानें आपल्या टेबलावरची गोंदाची बाटलीच मनुष्य रूपाने ह्या जगात पाठविली आहे, असें वाटतें ह्याला पाहून. ह्या गृहस्थाने एकदा कपडे अंगात घातल्यावर ते निघतात तरी कसे असा मला प्रश्न पडला आहे. काय करायचें तरी काय ह्या माणसापुढें ?

**सिंधूताई** : मला वाटतें कीं, त्याच्याशीं लग्न करणें हा एकच मार्ग शिल्लक राहिला आहे आता.

**कुंदा** : कधी कधीं अगदीं वैताग येतो आणि वाटतें कीं करावें टाकून त्याच्याशी लग्न आणि मोकळें व्हावें. पण लग्न केलें तरी ह्या माणसाची कटकट संपायची नाहीं. दिवसभर प्रेम करीत राहील तो माझ्यावर. मला रहस्यकथा वाचूं द्यायचा नाहीं अगर विणकाम करूं द्यायचा नाहीं.

**सिंधूताई** : तुझा जर इतका राग आहे त्याच्यावर तर पोलिसाच्या स्वाधीन कर त्याला.

**कुंदा** : हो. आधींच बदनामी होते आहे चार लोकात, ती जास्त व्हायची त्यामुळें. शिवाय आपल्यावर इतकें प्रेम करणाऱ्या माणसाशीं असें कठोरपणें वागायचें तरी कसें ? आणि लाघवी तर तो इतका आहे !

**सिंधूताई** : मला वाटतें कीं, तो माणूस तितका वाईट नाहीं. हल्लीं मला रस्त्यांत भेटल्यावर तो रोज नमस्कार घालतो.

**कुंदा** : माझ्यापुढें तर तो केव्हांही साष्टांग लोटांगण घालायला तयार असतो.

**सिंधूताई** : आणि परवां कीं नाहीं माझ्या डोक्यांत घोळणारी ती रहस्य-कथा त्यानें सगळी ऐकून घेतली, आणि तो म्हणाला कीं आपण ती प्रसिद्ध करूं.

**कुंदा** : तरीच ! म्हटलें आमच्या आईसाहेब अशा खूष कां त्याच्यावर ! घरांत देखील फंदफितूरी करायला सुरुवात केली म्हणायची त्या लोचट माणसानें ! पण नाहीं. मी त्याला कधींच फसणार नाहीं. माझें बेगुमानांच्यावर प्रेम आहे आणि त्यांच्याशींच मी लग्न करणार.

**सिंधूताई** : मला बाई नाहीं कौतुक वाटत आतां बेगुमानाचें.

**कुंदा** : आई, तूंच का बोलते आहेस हें ?

**सिंधूताई** : परवां त्या राजानें माझी रहस्यकथा प्रसिद्ध करायचें कबूल केल्यापासून मला सारख्या नव्या नव्या रहस्यकथा सुचायला लागल्या आहेत. आणि मला वाटतंय् कीं, बेगुमानांच्यापेक्षां मीच अधिक चांगल्या रहस्यकथा लिहीन. माझ्या एका कथेंत तर एका चोरानें ससा पाळलेला असतो. तो ससा श्रीमंत लोकांच्या खिशांतलीं नोटांचीं पुडकीं लांबवतो.

**कुंदा** : अस्सें ! आणि ते पैसे मोजून बँकेंत नाहीं का टाकत तो ?

**सिंधूताई** : नाहीं गडे, हें मला सुचलें नव्हतें. पण मी रहस्यकथा लिहीन ना तेव्हां ......

**कुंदा** : आई, काय म्हणावें तुझ्या ह्या भोळेपणाला ? तो राजा तुला बनवतो आणि तूं फसतेस.

**सिंधूताई** : छट् ! कांहीं तरी काय बोलतेस ? परवां मीं त्याला भाजी-मार्केटांत ही कल्पना सांगितली, तेव्हां आश्चर्यानें तो इतका थक्क झाला कीं, टॉमेटोनें भरलेल्या एका टोपलींत तो मटकन् बसला.

**कुंदा** : त्याला उडतां आलें असतें तर तो आश्चर्यानें थक्क होऊन राजाबाई टॉवरवर देखील जाऊन बसला असता. ( दार वाजतें ) कोण आहे ?

( बाहेरून ) मी सुदाम उंचाडे. इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचा प्रोप्रायटर.

**कुंदा** : इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचे प्रोप्रायटर ! कोणी तरी बडे गृहस्थ दिसताहेत. उघड ग आई दार.

[ सिंधूताई दार उघडतात. एक उंच आणि किडकिडित मनुष्य 'इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट' असें वर लिहिलेली एक भली मोठी पाटी एका बगलेंत आणि दुसऱ्या बगलेंत एक स्टूल व घडीची खुर्ची असा सरंजाम घेऊन प्रवेश करतो. ]

**कुंदा :** अगबाई ! हा तर जरीपुराणवाला दिसतो आहे.

**सुदाम :** नाही, मी इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचा मालक आहे.

**सिंधूताई :** म्हणजे तुम्ही परदेशात पेढेबर्फीचे पुडे पाठवितां की काय ?

**सुदाम :** नाही. सध्या मी ह्या आळींतच आलेपाकाच्या वड्या विकतो. पण अमेरिकेला बत्तासे पाठविण्याची एक स्कीम माझ्या डोक्यात आहे. पुरेसें भांडवल जमलें की ती अमलात आणूं.

**कुंदा :** वा रे इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट !

**सुदाम :** वाढता धंदा आहे. तेव्हां पुढें अडचण पडूं नये म्हणून आधींच मोठें नाव घेऊन ठेवलें आहे. शिवाय प्रतिभावंत मराठी साहित्यिकांचें साहित्य वाचून मी आशावादी व मानवतावादी झालों आहे. ह्या उच्च मूल्यावर ......

**कुंदा :** तुमचीं उच्च मूल्यें राहूं देत बाजूला. तुमच्या आलेपाकाच्या वडीचें मूल्य सांगा.

**सुदाम :** एका वडीचे मी चार आणे घेत असतों.

**कुंदा :** ना ! तुमचें हें मूल्य देखील फार उच्च दिसतंय्. आम्हाला नको तुमच्या वड्या.

**सिंधूताई :** आणि हें सामान कसलं आणलंय् तुम्ही ! आणि त्याची मांडामांड कशाला करताय् ?

**सुदाम :** हें आमच्या इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचें ऑफिस. मला वाटतें ही पाटी अशी खिडकींतून बाहेर लोंबत ठेवली तर ठीक होईल.

**कुंदा :** लाज नाहीं वाटत तुम्हाला ? कोणाच्या परवानगीनें थाटताय तुम्ही आपलें ऑफिस ह्या जागेंत ?

**सुदाम :** कोणाच्या म्हणजे ? आपले भावी पतिराज श्री. राजाभाऊ धडपडे ह्यांची परवानगी घेतली आहे मीं. एक टेबल मावेल एवढी जागा द्यायचें त्यांनीं कबूल केलें आहे.

**कुंदा :** आण ग आई ती काठी. निघतां येथून बाहेर, कीं करूं कपाळमोक्ष ?

**सुदाम :** अरे बाप रे ! पण पण......

**कुंदा :** चालते व्हा म्हणतें ना आधीं.

**सुदाम :** [ बाहेर पळत ] बरें बरें, जातों, जातों. पण माझें ऑफिस ?

**कुंदा :** हें पाहा तुमचें ऑफिस आलें तुमच्या मागोमाग.

[ स्टूल व घडीची खुर्ची बाहेर फेकते आणि दार लावून घेते. ]

**सिंधूताई :** फारच उदार हृदय दिसतंय ह्या राजा धडपड्याचें.

**कुंदा :** डोकें फिरायची पाळी आली आहे आई माझें. ( पुन्हा दार वाजतें. ) आतां कोण आलंय ? एखाद्या युनिव्हर्सल शू फेडरेशनचे मालक आपलें बूट रिपेअरिंगचें दुकान थाटायला तर येथें आले नाहींत ? ( आणखी एकदा दार वाजतें. ) कोण आहे ?

**राजा :** ( बाहेरून ) मी तो राजा.

**कुंदा :** चालते व्हा, चालते व्हा आधीं इथून.

**राजा :** ( बाहेरून ) अग ! असें नको करूं. मीं एक कविता रचून आणली आहे तुझ्यावर.

**कुंदा :** कां ? गद्यांत पुरेसा त्रास देतां येत नव्हता वाटतें ?

**राजा :** ( बाहेरून ) त्रास ? लाडके, तूं प्रीतीला त्रास म्हणतेस ? तर मग तुझा फारच मोठा गैरसमज झाला आहे. पण हरकत नाहीं. माझें हें काव्य एकदा वाच, कीं तुझ्या मनांतला हा गैरसमज पळून जाईल. कितीही मोठा गैरसमज ह्या काव्याच्या फक्त दोन ओळींनीं खलास होईल.

**कुंदा :** हें काय काव्याचें वर्णन आहे कीं जंतुघ्न औषधाची जाहिरात आहे ? तें कांहीं असो, मी तुम्हांला साफ सांगतें कीं मला तुमचें काव्य ऐकायचें नाहीं आणि तोंडसुद्धां पाहायचें नाहीं.

**राजा** : (बाहेरून) तर मग मला माझें काव्य बाहेरूनच ऐकवावें लागेल. (गळ्यावर) दाहक किती प्रीती तव ......

**कुंदा** : नको ! नको ! मिस्टर घडपडे, त्यापेक्षां तुमची कविता वाचणें मी कबूल करीन. दार उघडतें मी. (तिच्या डोक्यांत कांहींतरी विचार येतो.) थांबा हं. (ती जाऊन कोपऱ्यांतली छडी आणते आणि दार उघडते.)

[ राजा कविता म्हणत प्रवेश करतो. ]

**राजा** : दाहक किती प्रीती तव ......

[ कुंदा छडीनें मारूं लागते. ]

**राजा** : ( उड्या मारीत ) दाहक किती प्रीती तव. दाहक किती प्रीती तव. दाहक किती प्रीती तव. नको नको प्रीती तव.

**कुंदा** : आतां समजलें ना माझी प्रीती किती दाहक आहे तें ?

[ छडी राजाच्या डोक्यावर बसते आणि राजा
बेशुद्ध पडतो — नव्हे तसें सोंग करतो. ]

**सिंधूताई** : अग, खूनबीन केलास कीं काय तूं ?

**कुंदा** : कांहींच्या बाहीं काय बोलतेस आई तूं ! बघ बरें त्यांना काय झालें तें.

**सिंधूताई** : ( पुढें होऊन ) शुद्ध गेलेली दिसते आहे.

**कुंदा** : अयाई ग ! मीच मेली दुष्ट आहे. माझ्यावर त्यांनीं इतकें प्रेम केलें आणि मीं मात्र चिडून त्याना छडीनें मारलें. मिस्टर घडपडे. राजा—राजा—

**राजा** : पाणी—पाणी.

**कुंदा** : आई, आण ग पाणी.

[ सिंधूताई पाणी आणून राजाच्या तोंडाला लावतात. ]

**राजा** : नको. तुमच्या हातचें नको. ह्यांच्या हातचें हवें आहे.

**कुंदा** : खोटारडा ! माझ्या हातचें पाणी पाहिजे काय ? हें घ्या तर.

[ त्याच्या तोंडावर पाणी ओतते. ]

**राजा** : अरे ! अरे !

**कुंदा :** आतां आलांत ना नीट शुद्धीवर ?

**राजा :** शुद्धीवर ? मी आतां स्वर्गात आहे. लाडके ! आज तूं माझ्या तोंडावर पाणी ओतलेंस, उद्यां माझ्या ओठाला चहाचा कप लावशील.

**कुंदा :** उगाच दया आली मला तुमची.

**सिंधूताई :** राजाभाऊ, माझ्या नवीन रहस्यकथेचें कथानक सागूं का तुम्हांला ?

**कुंदा :** राहूं दे ग तुझें तें कथानक. तुम्ही आधीं हें सागा मिस्टर कीं, सकाळपासून तुम्ही अनेक माणसें माझ्याकडे राहायला काय म्हणून पाठवीत आहात ?

**राजा :** म्हणजे ? बन्या आतांच येथें राहण्याचा प्रयत्न करीत होता कीं काय ?

**कुंदा :** आणि इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचें ऑफिस देखील माझ्या घरांत थाटलें जात होतें.

**राजा :** तरी मीं त्यांना सांगितलें होतें कीं, लग्न झाल्यावर मगच मला त्यांची व्यवस्था करतां येईल.

**कुंदा :** म्हणजे आपलें लग्न होणार असें तुम्ही गृहीत धरून चाललां आहांत म्हणायचें ?

**राजा :** अलबत् ! पण त्या प्रश्नाची आतां उगीच चर्चा नको. आतां माझी ही कविता वाच बरें तूं.

**सिंधूताई :** त्याच्या आधीं माझें रहस्यकथेचें कथानक ऐका ना तुम्ही.

**राजा :** हें पाहा सिंधूताई—नव्हे सासूबाई, तुमचें रहस्यकथेचें कथानक मी जरूर ऐकणार आहें. पण त्याच्याआधीं मीं तुमच्याकरितां आणलेली ही ताजी रहस्यकथा तुम्हीं वाचावी अशी माझी खास शिफारस आहे.

**सिंधूताई :** असें ? रहस्यकथा आणली आहे तुम्ही माझ्याकरितां ? पाहा कुंदा, हे किती चांगले आहेत तें.

[ सिंधूताई रहस्यकथा वाचूं लागतात. ]

**राजा** : आतां वाचतेस ना हें काव्य ?

**कुंदा** : छट् ! मला बेगुमानांचें 'तळघरातलें रहस्य' वाचायचे आहे.

**राजा** : माझ्या प्रीतीची बावनमजली स्कायस्क्रेपर सोडून तें तळघरांतलें रहस्य कसलें घेऊन बसते आहेस ?

**कुंदा** : तुमच्या प्रीतीचे जर बावन्न जिने चढावे लागणार असतील तर मला वाटतें कीं, तुम्हीं अधिक लठ्ठ आणि मजबूत बाईशीं संधान बांधलेलें बरें.

**राजा** : छे ! छे ! तुझ्या सोईनुसार माझ्या प्रीतीची इमारत बांधायला मी तयार आहें. बैठें घर हवें असल्यास बैठें घर, तळघर हवें असल्यास तळघर देखील.

**कुंदा** : चर्पटपंजरी संपायची नाहीं कधीं तुमची. आणा बरें तुमची कविता इकडे.

**राजा** : एकच नाहीं, चार पाच आणल्या आहेत मी.

**कुंदा** : नको, नको. एकच पुरे. (कागद उघडते) अँ—

> काती तुझी कोकिळेची
> ऐट मयूरपत्नीची ...... म्हणजे लांडोरीची !

काय चावटपणा माडला आहे हा धडपडे तुम्हीं ?

**राजा** : अँ ! अँ ! पाहू ! पाहूं ! हा रध्या बदमाष आहे लेकाचा. माझ्या खर्चानें दोन सिनेमे पाहून पुन्हां मला असा फशी पाडतो काय गुलाम ?

**कुंदा** : हा रध्या कोण ?

**राजा** : छे ! छे ! रध्या नव्हे, कवि रघुनाथ ! मराठी काव्याच्या क्षितिजावर उगवणारा तारा ! रुणझुणत्या शब्दाच्या श्रुतिमनोहर ओळी सहजमधुरपणें गुणगुणणारा काव्याच्या नभोवितानांतील स्वच्छंदी भारद्वाज !

**कुंदा** : अँ ! अर्थ काय ह्या शब्दांचा ?

**राजा** : इथें तरी कोणा लेकाला समजतोय्. पण जुन्या टीकाकाराना आवडणारें हें सुबोध मराठी आहे. तें कांहीं का असेना. ह्या बदमाष कवड्या रध्यानें...

**कुंदा** : बस् करा तुमची वटवट. मला इतके दिवस वाटलें होतें कीं, तुम्ही मूर्ख असलांत तरी तुमचें माझ्यावर खरेंखुरें प्रेम आहे. पण आतां मात्र लक्षांत आलें कीं तुमचें प्रेम भाडोत्री आहे. खरें म्हटलें म्हणजे दिव्य प्रेमाच्या स्फूर्तीनें तुम्ही एक उत्कृष्ट रहस्यकथा लिहायची. पानापानावर खून पाडायचे. प्रकरणागणिक दरवडे घालायचे. बिजलीसारखी बुद्धि चालवायची. त्याऐवजीं तुम्हीं कविता करून आणलीत—आणि ती देखील भाडोत्री. जा. चालते व्हा. तुमच्या प्रीतीचे बावन जिनेच काय पण एक पायरीदेखील चढायची माझी इच्छा नाहीं.

**राजा** : हां ! कुंदा ! माझी कविता भाडोत्री असेल, पण म्हणून माझें प्रेम भाडोत्री म्हणूं नको. शहाजहाननें काय ताजमहाल स्वतः बांधला ? काय तो पोरबंदरला जाऊन एक एक संगमरवरी दगड डोक्यावर घेऊन आग्र्याला चालत आला ? कीं लाकडाच्या परातींवर चढून तो घमेल्यातलें शिमीट ताज-महालाच्या भिंतींना थापीत बसला होता ? पण म्हणून त्याच्या प्रेमाला कोणी भाडोत्री म्हटलें नाहीं. आपण प्रेम करायचें आणि कवींच्याकडून त्यावर काव्यें लिहून घ्यायचीं ही राजांची प्राचीन काळापासूनची पद्धत आहे. तीच हा राजा वर्तमानकाळांत चालू ठेवतो.

**सिंधूताई** : ( टाळ्या वाजवतात ) किती छान आणि पल्लेदार बोलतां हो तुम्ही राजाभाऊ. कुंदा, तूं गडे ह्यांच्याशींच लग्न कर.

[ बेगुमान् खिडकींतून प्रवेश करतात. ]

**बेगुमान्** : खामोष !

**कुंदा** : अय्या ! खुद्द बेगुमान् ! आपण होऊन तुम्ही माझ्या घरीं आलांत ? किती आनंद झाला म्हणून सांगूं मला.

**राजा** : ते आपण होऊन आले, आणि मला काय कोणी आमंत्रण द्यायला गेलें होतें. मग त्यांचें तेवढें कौतुक आणि आमचें नाहीं. हा अन्याय होतोय मोठा. कां हो सिंधूताई ?

**सिंधूताई** : बरोबर आहे. आणि ह्या अन्यायाचा बदला म्हणून तुम्ही बेगुमानांच्या हनुवटीवर ठोसा मारा.

**राजा** : तसेंच केलें पाहिजे. (पुढें सरसावत) कां हो खामोष! सरळ लोकांच्या घरांत खिडकींतून शिरतां याचा अर्थ काय?

**बेगुमान्** : (पिस्तुल रोखून) खामोष!

**कुंदा** : अय्या! आई, बेगुमानांनीं पिस्तूल आणलें आहे बरोबर. किती शूर आणि धाडसी आहांत हो तुम्ही.

**बेगुमान्** : खामोष!

**राजा** : हॅ-हॅ-हॅ. अहो रागावतां काय राव? सहज आपली थट्टा केली तुमची. ठेवा कीं तें पिस्तूल खिशात. ही घ्या म्हैसूर मसाला सुपारी.

**बेगुमान्** : हां, खिशांतून हात बाहेर काढ. पिस्तूल काढायची ही युक्ती मला माहीत आहे.

**राजा**: पिस्तूल? अहो, पिस्तूल म्हणजे काय फौंटनपेन आहे खिशांत बाळगायला?

**बेगुमान्** : चूप! हात पुढें कर.

**राजा** : यस्, यस्. शेक हॅंडस्.

**बेगुमान्** : (पुढें होऊन राजाला हालवीत) मूर्ख मनुष्या......

**राजा** : अहो! अहो! तुम्हांला इंग्रजी येतं कीं नाहीं? शेक हॅंडस् म्हटलें तर मलाच धरून काय हलवताय्?

**बेगुमान्** : वटवट बंद कर. आणि ते हात वर करून ती खुंटी पकडून ठेव त्यानीं, म्हणजे ते कांहीं उपद्याप करणार नाहींत. उचल ते हात वर.

[राजा तसें करतो.]

**राजा** : हो, हो. पकडतों कीं खुंटी. लहानपणीं आई माझे हात असेच खुंटीला बांधून ठेवीत असे. आणि तुम्हांला लोंबकळायला खुंटी हवी असली तर ती पाहा तिकडे आहे.

**बेगुमान्** : मी कशाला लोंबकळूं खुंटीला?

**सिंधूताई** : तुम्ही नसणार लोंबकळत तर मी आपली लोंबकळतें.

**कुंदा** : आई!

**सिंधूताई :** माझी मेली कोणी हौसच पुरवीत नाहीं.

**राजा :** मला वाटलें कीं, आपली खिडक्यांतून उड्या मारायची आणि खुंट्यांना लोंबकळायची तुम्हाला हौस आहे.

**बेगुमान् :** हा प्रसिद्ध रहस्यकथालेखक बेगुमान कधींही दरवाजानें घरांत प्रवेश करीत नसतो.

**कुंदा :** ऐकलेंस आई, बेगुमान् किती धाडसी आहेत ते? ते दारांतून कधींच घरांत प्रवेश करीत नाहींत. गड्या बेगुमान्, माझें तुमच्यावर फार प्रेम बसलें आहे. आणि ह्या फाजील माणसाची तुम्हीं फजिती केल्यापासून तर तें प्रेम फार उत्कट झालें आहे.

**बेगुमान् :** आणि कुंदा, माझेंही तुझ्यावर प्रेम बसलें आहे. माझा विषय प्रेम नसून खून हा आहे. तेव्हां प्रेमाबद्दल मला बकवास् करता येणार नाहीं. पण इतकेंच सांगतों कीं, त्या दिवशीं त्या मवाली माणसाच्या कुशींत सुरी टोचून तूं जेव्हां वीरश्रीनें उभी राहिली होतीस तेव्हां माझें तुझ्यावर प्रेम बसलें. माझ्या पिस्तुलावर मीं जितकें प्रेम करतों, तितकें माझें तुझ्यावर प्रेम बसलें आहे. आणखी काय सांगूं ?

**कुंदा :** ऐकलंस आई ? बेगुमान् आपल्या पिस्तुलाइतकें माझ्यावर प्रेम करतात. आज खरोखरच माझें जीवित सफल झालें.

**राजा :** काय चमत्कार आहे पाहा! कुंदा, स्वर्गांतल्या एकशें एक अप्सराहून तूं मला अधिक आहेस असें मीं तुला सांगितलें तेव्हां तुझा चेहरा फुलला नाहीं. आणि एका पिस्तुलाइतकी तुझी किंमत केली तर तुझें जीवित सफल होतें काय ? मला माहीत असतें तर मीं अप्सराऐवजीं पिस्तुलें म्हटलें असतें. तसें कशाला ? आतांच म्हणून टाकतों कीं, एकच काय पण एक डझन सहाबारी पिस्तुलांपेक्षां मला तुझी किंमत अधिक वाटते.

**कुंदा :** तुमचें म्हणणें आणि बेगुमानांचें म्हणणें ह्यात फार फरक आहे मिस्टर धडपडे.

**राजा :** कां ? ते खिडकींतून उड्या मारतात म्हणून ? तसें पाहिलें तर मीं धांवत्या बसमध्यें अनेक वेळां उडी मारलेली आहे.

**कुंदा :** इतकी साधी गोष्ट कशी तुमच्या ध्यानांत येत नाहीं धडपडे ? अहो, ते तुमच्याहून अधिक चतुर आणि धाडसी आहेत.

**राजा :** मुळींच नाहीं. ही गोष्ट कबूल करायला मी अजिबात तयार नाहीं.

**कुंदा :** तसें नसतें तर तुम्ही असे खुंटीला लोंबकळत उभे राहिले नसतात.

**राजा :** त्याच्याजवळ पिस्तूल आहे म्हणून. आणि इतकेंच असलें तर हे पाहा मीं हात सोडले खुंटीचे. चालवा बेगुमान् तुमचें पिस्तूल.

**बेगुमान् :** भेकड माणसांवर मी पिस्तूल चालवीत नसतों. उद्यां तुम्ही मला पिस्तुलानें ढेकूण मारायला सांगाल.

**कुंदा :** आजचें एक राहूं द्या. पण त्या दिवशीं तर पिस्तूल नव्हतें बेगुमानाच्याजवळ ? मग हनुवटीवर गुद्दा खाऊन भूमिगत कसे झाला होतात त्या दिवशीं ?

**राजा :** त्या दिवशीं आमची नैतिक बाजू लंगडी होती म्हणून. नाहींतर एका बेगुमान्‌ऐवजीं 'बे' गुमान् दृष्टीस पडले असते तुझ्या.

**कुंदा :** अशा लंगड्या सबबी तुम्हांला नेहमींच सागतां येतील.

**राजा :** मुळींच नाहीं. माझ्या कर्तबगारीच्या गोष्टीही मला सांगतां येतील. आजच, मी ज्या अमेरिकन कंपनींत काम करतों तिच्या मॅनेजरनें, माझ्या अंगांत 'पुश' आहे म्हणून मला ऑफिसरची जागा देऊं केली आहे.

**कुंदा :** ही कुठची बाई अमेरिकन कंपनी ? इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट तर नव्हे ?

**राजा :** तो 'इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट'वाला बापडा स्वतःच्या पैशावर धंदा करतोय्. पण हे सुप्रसिद्ध रहस्यकथालेखक इंग्रजी लेखकांच्या पुस्तकांचीं भाषांतरें करून गुजराण करतात. त्या दृष्टीनें ह्यांचीच कामगिरी अधिक आंतरराष्ट्रीय स्वरूपाची आहे ह्यात शंका नाहीं.

**बेगुमान् :** खामोष ! खामोष.

**कुंदा :** होय हो बेगुमान ? हे म्हणतात तें खरें आहे ?

**बेगुमान् :** खामोष ! खामोष ! हा अपमान होतोय् माझा.

**राजा** : माझें इतकेंच म्हणणें आहे कीं, आमच्या दोघांच्या कर्तबगारीची आणि धाडसाची तूं परीक्षा घे.

**सिंधूताई** : होय गडे कुंदा, ह्या दोघांची चढाओढ लाव तूं. माझी आणि राधाबाईची जशी महिलामंडळांत रहस्यकथा सांगण्याच्या बाबतींत लागली होती ना तशी. मला किनई फार हौस आहे असल्या चढाओढींची.

**कुंदा** : उगीच बेगुमानांचा असा अपमान कशाला करायचा आई ?

**सिंधूताई** : तें कांहीं नाहीं. ह्या बाबतींत तूं माझें ऐकलेंच पाहिजे. माझी मेली कसली हौसच होत नाहीं.

[ बन्या लंगडत प्रवेश करतो. त्याच्या कपाळावर भलें मोठें टेंगुळ आलेलें असतें. ]

**बन्या** : मिस् देशमुख ! कुंदाताई ! कसेंही करून तुम्ही तावडतोब राजाशीं लग्न करा. माझें मंदाशीं लग्न व्हावें म्हणून तरी तुम्ही राजाशीं लग्न कराच.

**कुंदा** : हें पाहा, मी तुमच्या ह्या राजाशीं मुळींच लग्न करणार नाहीं, आणि केलें तरी तुम्हांला इथें कधींच थारा देणार नाहीं.

**बन्या** : राजा, तूं कसेंही कर आणि ह्याच्याशीं लग्न कर. तावडतोब लग्नाला उभा राहा. पाहिजे तर आतां धावत जाऊन मी भटजी आणि वाजंत्री घेऊन येतों.

**राजा** : हो, हो, बन्या ! जरा आवरतें घे. असें एकदम झालें तरी काय ? तुझा पाय कशानें मोडला ? आणि हें टेंगुळ कशानें आलें तुझ्या डोक्यावर ?

**बन्या** : मंदा माझ्यावर भयंकर रागावली आहे रे राजा.

**राजा** : हो, तें लक्षांत येतंच आहे ह्या टेंगळाच्या आकारावरून.

**बन्या** : आणि राजा, तूं जर ह्यांच्याशीं लग्न करून मला जागा दिली नाहींस तर आमचें लग्न व्हायचें नाहीं. आणि मला कोहाळ्याची वडी कधींही खायला मिळायची नाहीं. ( रडूं लागतो )

**राजा** : उगी, उगी बन्या, रडूं नको. मी देईन तुला कोहाळ्याची वडी. हात रे काऊ.

**सिंधूताई** : तें कांहीं नाहीं कुंदा. ह्या दोघांची चढाओढ आपण लावलीच पाहिजे.

**बेगुमान्** : हरकत नाहीं कुंदा. खरें म्हटलें म्हणजे ह्या माणसाशीं स्पर्धा करणें मला कमीपणाचें वाटतें. पण तुझ्या प्रेमाकरितां मी ह्या स्पर्धेत भाग घ्यायला तयार आहें. बोला, काय करायचें आम्हीं ?

**राजा** : बोला, काय करायचें ? ( दंड थोपटतो. बैठका काढतो. )

**सिंधूताई** : किनई, त्या राधाबाईनीं माझ्याकडून पांच रहस्यकथा वाचायला नेल्या आहेत. तीं पुस्तकें तुम्ही चोरून आणून द्या.

**राजा** : हात्तिच्या ! एवढेंच ना ? काय त्या पुस्तकांचीं नांवें ?

**सिंधूताई** : 'तरुणींचें रहस्य', 'रहस्यांतील तरुणी', 'तरुणी आणि रहस्य', 'रहस्य आणि तरुणी' आणि 'रहस्यमय तरुणी'.

**बेगुमान्** : आणि त्यांचें घर कुठेंसें आहे ?

**सिंधूताई** : ह्या रस्त्याला डावीकडेच शेवटलें घर आहे तें.

**बन्या** : राजा, त्या घरांत जाणें अत्यंत धोक्याचें आहे. तेव्हां तूं दुसरी कोणती तरी परीक्षा घ्यायला सांग त्यांना.

**राजा** : डरो मत् बन्या ! कपाळाला टेंगुळ आल्यामुळें तुझी झुंझारवृत्ति जरा कमी झाली आहे. पण हा पठ्या पाच मिनिटात हें काम फत्ते करून येईल.

**बन्या** : राजा, पुन्हा सांगतों, तुला तुझे दोन्ही पाय शाबूत राहायला हवे असतील तर......

**राजा** : डरो मत् बन्या ! चला बेगुमान् ! बाकी तुम्ही खिडकींतून जाणार असाल म्हणा. आम्ही आपले दरवाजानें जातों.

**बेगुमान्** : खामोष !

[ राजा पळून जातो. बेगुमान् खिडकींतून उडी टाकून जातो. ]

**बन्या** : आतां हे दोघेही आपल्या दृष्टीस पडायची शक्यता नाहीं.

**कुंदा** : धडपड्यांच्या बाबतींत तुम्ही म्हणतां तें खरें असेल, कारण मला असें वाटतें कीं ते मुळीं सरळ घरीं जाऊन झोपतील. पण बेगुमान् मात्र पुस्तकें घेऊन येतील.

**बन्या :** पुस्तकें राहिलीं बाजूला, आपल्या दोन्ही तंगड्या घेऊन माघारीं आले तरी पुष्कळ झालें.

**सिंधूताई :** कां हो ?

**बन्या :** त्याचें असें झालें कीं, मंदा येथून रागानें गेली आणि तिनें घरीं जाऊन दार धाडकन् लावून घेतलें तेव्हा मीं खिडकीतून तिच्या–म्हणजे तिच्या काकाच्या–घरांत शिरण्याचा यत्न केला. पण तें तिच्या काकानीं पाहिलें. तशी ताबडतोब त्यांनीं माझी तंगडी पकडली आणि राधाबाईंनीं धुण्याच्या काठीनें माझें टाळकें सडकायला सुरुवात केली. गयावया करून कसाबसा सुटलों त्याच्या हातांतून. पण त्यांनीं मला अशी धमकी दिली आहे कीं, 'पुन्हा असे घरात आलात तर तंगडी मोडून टाकीन.' फार जबरदस्त आहेत तुमच्या त्या राधाबाई.

**सिंधूताई :** पाहिलेंस कुंदा, राधाबाईंनीं काठीनें ह्याचें डोकें सडकून काढलें. आणि मीं मात्र कोणाला मारलें नाहीं. मी आतां ह्यांना मारूं का ग ? म्हणजे राधाबाईंची मिजास चालायची नाहीं.

**बन्या :** नको, नको. कुंदाताई, आवरा त्याना.

**कुंदा :** नको हं आई.

**सिंधूताई :** आमची मेली-ती कसली हौसच होत नाहीं.

**कुंदा :** तुमचें हें ऐकून मला बाई ह्या दोघांविषयीं काळजी वाटायला लागली आहे.

**बन्या :** दोघांची ?

**कुंदा :** धडपड्यांची मला जास्त काळजी वाटते आहे. बिचारे फुकट मार खातील. बेगुमान् काय शूर आणि धाडसी आहेत.

**बन्या :** ज्या अर्थी तुम्हांला राजाची काळजी वाटते त्या अर्थी तुमचें त्याच्यावर प्रेम असावें.

**सिंधूताई :** मलाही तसेंच वाटतें. शिवाय ते माझी. रहस्यकथा छापणार आहेत.

**कुंदा :** फंदफितूरी माजवण्यांत ते हुषार आहेत, एवढें मात्र खरें.

[ राजा धावत प्रवेश करतो. ]

**राजा :** हां! हीं घ्या तुमचीं पुस्तकें.

**कुंदा :** ऑं.

**बन्या :** ऑंऽऽऽ.

**सिंधूताई :** अगबाई ! खरेंच आणलीं कीं ह्यांनीं हीं पुस्तकें.

**राजा :** बन्या, दे टाळी. उद्यांच्या उद्यां तूं येऊन ह्या खोलीचा कबजा घे. आणि बाईसाहेब, तुमचा कबजा मी आतांच्या आतां घेणार आहे.

**कुंदा :** मी तर बाई अगदीं गांगरून गेलें आहे. हें असें कसें झालें ? बेगुमान् इतके धाडसी आणि चतुर......

**राजा :** ह्याचा अर्थ इतकाच कुंदा, कीं त्या माणसापेक्षां मी कितीतरी पटीनें अधिक हुषार आणि चतुर आहें.

**कुंदा :** मला वाटतें कीं कांहींतरी लबाडी आहे ह्याच्यांत. तुम्ही खालच्या स्टॉलवरून विकत तर नाहीं आणलींत हीं पुस्तकें ?

**राजा :** मुळींच नाहीं. तुम्ही स्टॉलवाल्याला विचारा.

**कुंदा :** मथवून ठेवलें असेल तुम्हीं त्याला.

**राजा :** तर मग तुम्ही खुद्द राधाबाईंनाच विचारा मीं त्यांच्याकडून पुस्तकें आणलीं कीं नाहीं तें.

**कुंदा :** कमाल आहे बाई ! असें कसें झालें हें ?

**राजा :** बन्या, आत्तांच्या आत्तां जा आणि भटजी व वाजंत्री घेऊन ये.

**बन्या :** राजा ! राजा ! तूं अगदीं त्या ह्याचा आजोबा शोभतोस रे.

**राजा :** तो हा कोण ?

**बन्या :** वत्सलेचें हरण करणारा रे तो आपला......

**राजा :** घटोत्कच होय.

**बन्या :** हां ! त्यानें जसें वत्सलेचें हरण केलें, तसें तूं ह्यांना अगदीं गरीब गाय बनवून टाकलें आहेस.

**कुंदा :** नक्की ह्याच्यांत कांहींतरी लबाडी आहे. बेगुमान् आले म्हणजे समजेल सगळें.

[ बेगुमान् खिडकींतून लंगडत प्रवेश करतात. ]

आले वाटतें ! अगबाई ! लंगडत आहेत हे.

**सिंधूताई :** त्यांचें नाक सुजलेलें दिसतंय्.

**राजा :** आणि त्यांच्या डोक्यावर आहेत तीं बहुधा टेंगळें असावींत.

**कुंदा :** काय झालें बेगुमान् ?

**बेगुमान् :** कांहींतरी दगाफटका झालेला आहे. मी खिडकींतून राधाबाईंच्या घरांत शिरणार आहे हें त्यांना कोणीतरी सांगितलें असावें. कारण त्या आणि त्यांचे यजमान खिडकीशीं दबा धरून बसलेले होते. मीं एक पाय आंत टाकला तोच मुळीं राधाबाईंच्या यजमानांनीं धरला, आणि राधाबाई धुण्याची काठी माझ्या डोक्यांत मारूं लागल्या.

**बन्या :** माझेंही अगदीं असेंच झालें बरें का.

**सिंधूताई :** पाहा, म्हणजे राधाबाईंनीं दोघांना मारलें आणि आम्हीं मात्र कोऽणाला मारलें नाहीं अजून.

**कुंदा :** मग सुटलांत कसे तुम्ही त्यांच्या हातून ?

**बेगुमान् :** सुदैवानें राधाबाईंनीं काठीचा एक फटका चुकून आपल्या यजमानांच्या डोक्यांत मारला. त्यामुळें ते तिरमिरी येऊन पडले आणि मी निसटलों त्यांच्या हातून.

**कुंदा :** मग गडे पिस्तूल कां नाहीं वापरलेंत तुम्हीं ?

**बेगुमान् :** डोक्यावर धुण्याची काठी बसत असली म्हणजे माणूस बऱ्याच गोष्टी विसरतो. तें जाऊं द्या. मला वाटतें कीं, आज राधाबाईंचीं तीं पुस्तकें चोरणें धोक्याचें आहे. तेव्हां उद्यांच हा प्रयत्न करावा.

**राजा :** कांहीं गरज नाहीं उद्यां प्रयत्न करण्याची. मी आजच घेऊन आलों आहे तीं पुस्तकें.

**बेगुमान्** : कशीं आणणें शक्य आहे ! राधाबाईंच्या घरांत शिरायला योग्य अशी एकच खिडकी आहे. मी सतत त्या खिडकीजवळ होतों. पण खिडकींतून आंत जातांना मीं ह्या माणसाला मुळींच पाहिलें नाहीं.

**राजा** : अहो, मी दरवाजानें आंत जाणारा माणूस आहे.

**कुंदा** : धडपडे, खरें सांगा तुम्ही कशीं पुस्तकें आणलींत तें.

**राजा** : कशीं आणलीं तें आमचें बिझिनेस सीक्रेट आहे. आणलीं कीं नाहीं तें तूं पाहा.

**बन्या** : बरोबर आहे.

**कुंदा** : नाहीं ना सांगत तुम्ही ? तर मग मीच जाऊन विचारून येतें राधाबाईंना.

**राजा** : बरें बुवा ! सांगतों. मी सरळ राधाबाईंच्या घरीं गेलों. त्यांचें दार ठोकलें. आणि त्यांनीं तें उघडल्यावर म्हटलें कीं, सिंधूताईंनीं त्यांच्या पांच रहस्यकथा मागितल्या आहेत. ताबडतोब त्यांनीं त्या आणून दिल्या आणि मी त्या बगलेंत मारून येथें आलों. येतांना आपलें त्यांना खिडकीकडे लक्ष ठेवायला सांगून आलों.

**बेगुमान्** : बदमाष !

**कुंदा** : लबाड !

**राजा** : अग लबाड म्हणजेच चतुर.

**बेगुमान्** : ह्यांनीं चोरी करून तीं पुस्तकें आणलीं असें कोणीही म्हणणार नाहीं. आणि आपला वायदा चोरीचा होता.

**राजा** : मीं चोरी करूनच तीं पुस्तकें आणलीं. चोरी करण्याची ही सुद्धां एक पद्धतच आहे. चोरी करायची म्हणजे खिडकींतून उडी मारलीच पाहिजे आणि तंगडी मोडून घेतलीच पाहिजे असें थोडेंच आहे.

**सिंधूताई** : मला वाटतें कीं, राजाभाऊंनींच जास्त चतुराई दाखवली.

**कुंदा** : मी हें मुळींच ऐकणार नाहीं आणि बेगुमानांशींच लग्न करणार.

**राजा :** हें तर अजिबात चालणार नाहीं. कारण बेगुमानांनीं देखील तुझी अट पुरी केलेली नाहीं.

**बन्या :** राजा, ह्या प्रश्नावर आपण सुप्रीम कोर्टापर्यंत भांडूं.

**कुंदा :** बरें बाई. मी मुळीं आतां पुन्हा तुमच्या चतुराईची परीक्षा घेतें. मग तर झालें ?

**बेगुमान् :** हरकत नाहीं. दुसरी परीक्षा घे तूं आमची. आणि त्या वेळेला बरोबर पिस्तूल देखील न घेतां मी ह्या माणसाला नामोहरम करीन.

**राजा :** आपल्याला बुवा कांहीं हें पसंत नाहीं. पण उद्यांही मी जिंकणारच, तेव्हां कुंदाच्या मर्जीखातर ......

**कुंदा :** तर मग ऐका. उद्यां संध्याकाळीं साडेसात ते साडेनऊपर्यंत जो कोणी मला पळवून नेईल त्याच्याशींच मी लग्न करीन.

**सिंधुताई :** छान कल्पना आहे कुंदा तुझी.

**राजा :** शिवाय या कल्पनेंत मतभेदाला जागा नाहीं. पळवून नेली कीं नाहीं असा प्रश्न पडायचा नाहीं. आणि पडला तरी हिला पळवून नेल्यावर, आपण त्याला विशेषसें महत्त्व देणार नाहीं.

**बन्या :** राजा, जागेचा कबजा नाहींच मिळत अखेर मला.

**राजा :** घाबरूं नको बन्या. उद्यां मीं हिला पळवली कीं ताबडतोब तूं ह्या जागेचा कबजा घे.

**बेगुमान् :** कबजा बिबजा विसरा आतां सरंजामे. मीच नेणार हिला उद्यां पळवून. हं ! चला आतां. निघा माझ्याबरोबरच. तुम्हांला येथें राहूं देण्यांत अर्थ नाहीं. चला.

**राजा :** तुम्ही व्हा पुढें. मला जरा चार शब्द खाजगी बोलायचे होते.

**बेगुमान् :** तुमचे आणि कुंदाचे आतां कांहींही खाजगी संबंध राहण्याची शक्यता नाहीं. चला आतां.

[ तिघे जातात. ]

**सिंधूताई** : पण गडे, मला कोणीच का नाहीं पळवून नेणार? माझी मेली ती कशी हौसच होत नाहीं.

[ कुंदा दार लावून घेते. ]

**कुंदा** : आई, स्टोव्ह पेटवतें हं मी आतां. ( आत जाते. )

**सिंधूताई** : आता आपली मी दिवा मालवून अंधारांत बसतें. म्हणजे तेवढी तरी भीति वाटेल मला आणि हौस होईल माझी.

[ दिवा मालवते आणि जरा वेळानें ती मोठ्यानें किंचाळते. ]

**कुंदा** : ( आंतून ) काय झालें ग आई ?

**सिंधूताई** : अग ! मला पळवून नेतेंय कोणी तरी.

[ कुंदा येऊन दिवा लावते. राजा व सिंधूताई दृष्टीस पडतात. ]

**राजा** : तुम्ही होय ! ( मटकन् खालीं बसतो. )

**कुंदा** : काय हो शेंदाड शिपाई ! आतां कशाला आलांत परत ? उद्यांचा दिवस ठरलाय् ना ?

**राजा** : हो, दिवस उद्यांचाच ठरलाय्. पण मीं अजून कधीं बायकांना पळवून नेलेलें नाहीं. तेव्हां आपली जरा प्रॅक्टिस करीत होतों.

**कुंदा** : तुमच्या प्रॅक्टिसवरून असं दिसतंय् कीं, तुम्ही उद्यां माझ्याऐवजीं आईलाच पळवून नेणार.

**राजा** : छे ! छे ! भलतेंच.

**सिंधूताई** : त्यांत कसलें आलें आहे भलतेंच ! न्या हो तुम्ही मलाच पळवून. न्याल ना ? न्याल ना ?

**राजा** : बाप रे ! पळा पळा कोण पुढें पळे तो !

[ पळत जातो. पडदा पडतो. ]

# ३



[ कुंदाचें घर. काळोख पडूं लागला आहे. कुंदा आणि तिची आई अस्वस्थपणें इकडे तिकडे करीत आहेत. ]

**सिंधूताई :** काय ग कुंदा, साडेसात वाजायला आले आहेत. आतां तुला पळवून न्यायला येतील नाहीं का ते दोघे ?

**कुंदा :** इं. मला कसें बाई चमत्कारिक वाटतंय्.

**सिंधूताई :** थोडा चहा करूं का मग ? त्या दोघांच्याकरितां देखील करतें मी चहा. त्यांना म्हणावें, दोघांनीं चहा घ्या आणि मग काय पळवून न्यायचें तें न्या.

**कुंदा :** वा ! पळवून नेणाऱ्या माणसांना काय चहा द्यायचा असतो वाटतें ? उद्यां तूं चोर घरांत आला कीं शिरा करायला लागशील.

**सिंधूताई :** बरें बाई ! मग तुला पळवून न्यायची तरी करूं का मी तयारी ? बांधायला एक दोरी, तोंडांत कोंबायला एक बोळा, आणि आंत भरून न्यायला एक मोठी ट्रंक, एवढें सामान नाहीं का लागायचें ? आणि बरें का कुंदा, आपल्या घरांत ती जुनी मोठी पेटी आहे ना, त्यांत माणूस कसें छान मावतें. मीं काल बसून पाहिलें तिच्यांत.

**कुंदा :** काय ग आई , पळवून नेण्याविषयीं तुझी कल्पना आहे तरी काय ! ती काय सत्यनारायणाची पूजा आहे किंवा हळदीकुंकवाचा समारंभ आहे ?

**सिंधूताई :** मला बाई फाऽऽर हौस वाटते असल्या गोष्टींची.

**कुंदा :** मग शेजारपाजारच्या चार बायकांना नाहीं ना बोलावलेंस या समारंभाला !

**सिंधूताई :** खरेंच गडे! राधाबाईना बोलवायला हवें होतें आपण. बेगुमानांच्या डोक्यांत काठी मारल्यापासून त्या भलत्याच चढून गेल्या आहेत. त्यांनीं एकदा पाहिली पाहिजे ही गंमत. आणि गडे तुझ्याबरोबर मलाही पळवून नेताना त्यांनीं पाहिलें ना, तर डोळेच फाटतील त्यांचे. खरेंच गडे! तूं सांग त्या दोघांना तुझ्याबरोबर मलाही पळवून न्यायला. नाहींतर म्हणावें, एकानें एकीला पळवून न्या आणि एकानें दुसरीला न्या.

**कुंदा :** अग आई, पण तुला कशाला कोण पळवून नेणार आहे?

**सिंधूताई :** कां? मी काय म्हातारी झालें आहें कीं काय? सुप्रसिद्ध नटी किशोरी माझ्या वर्गांत होती म्हटलें.

**कुंदा :** काय म्हणतेस? तिनें तर परवां आपला विसावा वाढदिवस साजरा केला.

**सिंधूताई :** असें का? मग ती आपलें वय साठ वर्षांपासून उलटें मोजीत असावी. शाळेंत असताना तिचें गणित कच्चेंच होतें. तिच्यासारखीच आमची माली देवधर बरें का!

**कुंदा :** कोण? मालू देवधर? अम्बाडा कीं शेपटा ह्या वादविवादांत सगळ्या महाराष्ट्राला गदगदा हलविणारें पुरोगामी लिखाण करणारी बंडखोर विदुषी?

**सिंधूताई :** होय–होय. तीच. पहिल्यानें ती लिहायला लागली तेव्हां मालतीबाई देवधर असें नांव लावत असे. नंतर तिशी उलटल्यावर ती मालती देवधर झाली. सध्यां ती मालू देवधर आहे. आणि मला असं वाटतंय् कीं, कांहीं दिवसांनीं ती लू देवधर होईल.

**कुंदा :** आणि त्यापुढें ती 'ऊ' देवधर झाली नाहीं म्हणजे नशीब.

**सिंधूताई :** तेव्हां सांगायचें काय कुंदा कीं, माझें वय कांहीं फार नाहीं. बेगुमानांचें आणि माझें वय सारखेंच असेल.

**कुंदा :** खरेंच! बेगुमानसुद्धां वयाने मोठे आहेत. पण गडे ते किती हुषार आणि धाडसी आहेत.

**सिंधूताई :** कसले आले आहेत धाडसी ? परवां राधाबाईंच्या हातून देखील मार खाल्ला त्यांनीं.

**कुंदा :** तो त्या राजाच्या फाजिलपणामुळें. अस्सा राग येतो मला त्या माणसाचा ! वाटतें कीं......

**सिंधूताई :** काय वाटतें ?

**कुंदा :** वाटतें कीं कडकडून चावावें त्या माणसाला.

**सिंधूताई :** मग मला वाटतें कीं तुझें प्रेम आहे त्याच्यावर.

**कुंदा :** प्रेम ? मुळींच नाहीं. पण तो मला त्रास देत नसला म्हणजे चुकल्याचुकल्यासारखें वाटतें.

**सिंधूताई :** अग, मग तेंच तें.

[ राजा, मंदा, सुदाम व इतर दोन मित्रांबरोबर प्रवेश करतो. ]

**सिंधूताई :** अगबाई ! ही कुठची मिरवणूक ?

**राजा :** मिरवणूक नव्हे ही सिंधूताई. ही फौज आहे फौज. शिवाय मागाहून कुमक येते आहे.

**कुंदा :** कुमक ?

**राजा :** होय. चार टोळभैरव जमा करून पिछाडी संभाळण्याचा मीं बन्याला हुकूम केला आहे.

**कुंदा :** पण......

**राजा :** खामोष !

**बाकीचे :** खामोष !

**राजा :** ए ! तुम्ही काय खामोष म्हणतां ? खामोष मी म्हणणार आणि तुम्हीं आतां मी सांगतों तसे कामाला लागा. मन्या, तूं खिडकीच्या खिंडींत शत्रूला जिवाच्या शर्तीनें थोपवून धर. सुदाम, तूं दारावर गस्त घालून, येईल त्या शत्रूला नेस्तनाबूद कर. मंदाताई, तुम्ही सिंधूताईंची नाकेबंदी करा.

**सुदाम :** राजा, मला खिडकीवर उभा कर. कारण खिडकीच्या बाहेर मीं इंटरनॅशनल स्वीटमीट मार्टचें ऑफिस ठेवलेलें आहे.

**राजा** : ठीक आहे. अर्ज मंजूर. पण सुदाम, सावधगिरीनें चौफेर नजर टाकीत राहा. वखत बांका आहे. आणि शत्रू मोठा हुन्नरी आणि कावेबाज आहे. हातांत पिस्तूल घेऊन खिडकींतून उड्या मारायची त्याला संवय आहे.

**सुदाम** : बाप रे ! तर मग राजा, मी आपला दरवाजाशींच उभा राहतों' दरवाजाबाहेर देखील उभें राहायची तयारी आहे माझी.

**राजा** : सुदाम, अशी कच खाऊं नकोस. आपल्या गोटांत अशी बेदिली माजवूं नको. तुंबळ युद्धाचा प्रसंग आहे. आणि माझ्याही खिशांत पिस्तूल आहे हें लक्षांत ठेव.

**सुदाम** : नको नको राजा ! कृपा करून तूं पिस्तूल तेवढें झाडूं नको. एक वेळ शत्रूचा नेम हुकेल पण तुझ्या गोळीनें मात्र मला नक्की मरण येईल.

**राजा** : अमेरिकेला बत्तासे पाठविण्याची धाडसी योजना आंखणाऱ्या बंडखोर तरुणा ! तूं यःकश्चित् एका गोळीला घाबरावं ना ? यशाच्या चतुःसूत्रींतलें धडाडी हें मूळ सूत्र तूं विसरलास वाटतें ?

**सुदाम** : यशाचें सूत्र राहील बाजूला आणि माझ्या नाकाशीं सूत धरण्याचा मात्र प्रसंग येईल.

**राजा** : घाबरूं नको. तसा प्रसंग पडला तर माझ्याजवळ सुताचा एक भला मोठा गुंडा आहे. एकच काय, दहा सुतें धरीन मी तुझ्या नाकाशीं.

**सुदाम** असें आहे म्हणतोस ? मग फिकीर नाहीं कसली. पण राजा, तूं ह्यांना पळवून नेल्यावर मी माझें ऑफिस येथें थाटूं ना ?

**राजा** : अलबत् ! तुझें हेड ऑफिस, ब्रँच ऑफिस सगळें येथें थाट.

**मंदा** : पण राजाभाऊ, ही जागा तुम्ही मला देणार होतात ना ?

**इतर** : आणि आम्हांला पण देणार होतास ना ?

**राजा** : सबूर ! सबूर ! लुटालूट करायच्या आधींच लुटीच्या मालाच्या वांटणीचा विचार करणें युद्धशास्त्राच्या नियमांच्या विरुद्ध आहे. श्रीशिवप्रभूंनीं जेव्हां सुरत लुटली तेव्हां लुटींत मिळालेल्या सगळ्या शेवगांठ्या मला हव्यात असा हट्ट संभाजीराजांनीं धरला होता काय ?

**मंदा** : किती परिणामकारक बोलतां हो तुम्ही राजाभाऊ ?

**सुदाम** : आमचा राजा म्हणजे शब्दांचा बरकंदाज आहे.

**सिंधूताई** : अं ! अं ! अहो, गुदमरलें ना मी ?

**राजा** : ऑं ! मंदाताई, तुम्हीं नाक कशाला धरून ठेवलंय सिंधूताईचें ?

**मंदा** : तुम्हीच नाहीं का मला त्यांची नाकेबंदी करायला सांगितलेंत ?

**राजा** : सोडा, सोडा त्यांना. सिंधूताई, तुम्ही त्या खुंटीला हात धरून उभ्या राहा.

**सिंधूताई** : खरेंच राजाभाऊ, तुम्हांला तेवढी माझी हौस समजते. पण गडे, बेगुमान् आल्यावर तुम्हांला नाहीं का लागायची ही खुंटी ?

**राजा** : खामोष ! आज ह्या घरांत बेगुमानच काय, पण त्यांची तुमान देखील प्रवेश करूं शकणार नाहीं.

**सिंधूताई** : हिअर ! हिअर !

**कुंदा** : धडपडे, तुम्ही मघापासून काय चालवलें आहे हें ? मला पळवून न्यायचें तें तुम्हीं एकट्यानें. इतक्या लोकांची मदत घेणें नियमांच्या विरुद्ध आहे.

**राजा** : कुंदा, मलाही एकट्यानेंच येऊन तुला पळवून नेणें आवडलें असतें. पण तूं आहेस हटवादी. तूं सरळ यायची नाहींस. तुला उचलून न्यावें लागेल. आणि लाडके, तूं जरी फुलासारखी कोमल आणि हलकी असल्याचें मीं माझ्या एकशें एकाव्या प्रेमपत्रांत म्हटलें असलें, तरी तुझें वजन एकशें पांच पौंड आहे हें वजनदार सत्य मला ह्यावेळीं विसरणें शक्य नव्हतें. एकशें पांच पौंड प्रेम खांद्यावर घेऊन पळून जाणें कुठच्याही पुरुषाला शक्य नाहीं असें मला वाटतें. त्याला महाभारतांतला पुरुषर्षभच पाहिजे.

**कुंदा** : तुम्हीं तोंडानें जर इतकी वाफ घालवली नसती, तर एवढ्या मोठ्या सैन्याची तुम्हांला गरज वाटली नसती.

**सिंधूताई** : बरोबर आहे हो राजाभाऊ तुमचें. मीं बेगुमानांच्या पांचशें रहस्यकथा वाचल्या आहेत. त्या सर्वांत तिजोरी किंवा तरुणी पळवून न्यायला चार माणसें तरी लागतातच.

**राजा :** पाहिलेंस कुंदा, शत्रुपक्षाची साक्ष देखील माझ्याच बाजूची आहे.

**कुंदा :** तुमच्या तोंडाला कोण लागेल ?

**राजा :** कोण म्हणजे ? लाडके, तूं, फक्त तूं. आणि हें पाहा कुंदा, तुला पळवून न्यायला जरी मीं एवढें मोठें सैन्य आणलें असलें तरी लग्न मात्र मी तुझ्याशीं एकटाच करणार आहे.

**कुंदा :** नशीब माझें ! नाहीं तर माझ्या जागेची जशी तुम्हीं वाटणी केली आहे तशी माझी देखील वांटणी करायचेत्. बाकी आतां बेगुमान् आल्यावर तुमच्या वांटणीला कांहींच यायचें नाहीं, ती गोष्ट निराळी.

**राजा :** बरी आठवण केलीस. बंड्या, मन्या, असे गाफील कसे रे तुम्ही ! सांगितलेलें काम विसरतां कसे तुम्ही ? धरा तिचा एकेक हात. मंदाताई, तुम्ही तिचें नाक पकडा. तिनें तोंड उघडलें कीं मी हा बोळा तिच्या तोंडांत कोंबतों. आणि मग हिला असेंच ओढत नेऊन खालीं टॅक्सींत बसवायचें.

**सिंधूताई :** पण माझें काय राजाभाऊ ? मी अशी खुंटीलाच लोंबकळत राहूं कीं काय ?

**राजा :** होय सिंधूताई. सध्यां तरी तुम्हांला तसेंच राहावें लागेल. मग बेगुमान् आले म्हणजे कदाचित् ते तुम्हांला नेतील पळवून. काय रे बंड्या, मन्या, पुढें व्हा म्हटलें ना ?

**बंड्या आणि मन्या :** आपल्याला बुवा लाज वाटते. कसेंसेंच वाटतें स्त्रीच्या अंगाला हात लावायचा म्हणजे.

**राजा :** मूर्खांनो, बाईच्या अंगाला हात लावायला घाबरतां, मग परकीय सत्तेला कसें हुसकावून लावाल ? स्वराज्य कसें मिळवणार तुम्हीं ?

**सुदाम :** पण राजा, स्वराज्य मिळालें आहे.

**राजा :** अरे खरेंच ! हें स्वराज्य मिळाल्यामुळें फार घोटाळा झालाय् बुवा. आतां वीरश्रीपूर्वक भाषणें करणें फार कठीण झालें आहे. 'अधिक धान्य पिकवा' ह्या विषयावर वीरश्रीपूर्वक तें काय आणि कसें बोलायचें बुवा ?

**कुंदा :** बेगुमान् आल्यावर पाहूं या कितपत बीरश्री टिकतेय् ती.

[ बाहेरून ‘इन्किलाब झिंदाबाद’ असें ओरडणें ऐकूं येतें. ]

अगबाई ! बेगुमान् वाटतें ? आणि असें ओरडताहेत कशाला ते ?

[ बन्या ओरडत, नाचत प्रवेश करतो. ]

**राजा :** बन्या ! बन्या ! बन्या ! काय झालें काय ? पिसाळलेला कुत्रा चावला कीं काय तुला ?

**मंदा :** मीं लग्न करायचें कबूल केलें तेव्हां देखील इतके बावचळले नव्हते ते.

**राजा :** बाप रे ! एकदम दहा मुलींनीं लग्न करायचें कबूल केलें कीं काय याच्याशीं ?

**मंदा :** होय का हो ?

**बन्या :** राजा झिंदाबाद, मंदा झिंदाबाद, बन्या झिंदाबाद.

**राजा :** अरे बन्या, पण झालें तरी काय ? डोक्यवर पाणी ओतूं का तुझ्या थोडेंसें ?

**बन्या :** खरेंच राजा, ओत. ओत. सगळा नायगाराचा धबधबा आणून माझ्या डोक्यांत ओत, तर तें ठिकाणावर येईल.

**मंदा :** पण काय झालें तें तरी सांगाल !

**बन्या :** मला असं वाटतंय् कीं, मी राजा झालों आहे.

**मंदा :** अस्सें ! म्हणजे तुम्ही हे आहांत असें वाटायला लागलंय् होय तुम्हांला ? पाहिलेंत राजाभाऊ ? म्हणून ते असा खुळचटपणा करीत आहेत.

**बन्या :** मंदा ! लाडके, तूं का ही ? किती छान दिसते आहेस तूं ? असं वाटतंय् कीं स्वर्गांतल्या सगळया अप्सरा ग्लासांत पिळून, त्यांचें बनवलेलें तूं केशरी सरबत आहेस.

**राजा :** माफ करा हं मंदाताई. मी खुळचट असेन कदाचित्, पण तुमच्याविषयीं मला असें कधींच वाटलें नव्हतें.

**मंदा :** ( राजास रागानें ) बरें ! बरें ! ( बन्यास लाडिकपणें ) नाहीं हो तुम्ही खुळचट ! कसे शहाणे आहांत. पण काय झालें तें तरी सांगा.

**बन्या :** काय झालें ? काय झालें तें तुला माहीत नाहीं? रस्तोरस्तीं ही बातमी ओरडत लोकांनीं मिरवणुका नाहीं काढल्या ? प्रेसिडेंट ट्रूमन आणि जनरॅलिझिमो स्टालिन ह्यांनीं तुला शुभेच्छादर्शक तारा नाहीं पाठविल्या ? राजाबाई टॉवर चालत चालत तुम्हांला अशी बातमी सांगत नाहीं आला कीं बन्याला शब्दकोड्यांत चाळीस हजार रुपयांचें बक्षीस मिळालें ?

**मंदा :** अय्या, खरेंच ? मग आपल्याला आतां स्वतंत्र ब्लॉक घेतां येईल.

**बन्या :** अलबत् ! मंदा, तुला एक ब्लॉकच काय पण एक इमारत घेऊन देणार आहें. सुदाम, तुला ताजमहाल हॉटेल विकत घेऊन त्याचा मॅनेजर केला तर तुझी कांहीं हरकत आहे का ?

**सुदाम :** नाहीं. पण मग माझ्या 'इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट'चें काय करूं ?

**बन्या :** अरे, तुझा तो स्वीटमीट मार्ट म्हणजे शंभर आलेपाकाच्या वड्याच ना ? आण त्या इकडे. तुझा सगळा स्वीटमीट मार्ट मी एकट्यानें खाऊन टाकतों.

**मंदा :** नको, नको. भलतेंच.

**बन्या :** गडबड केलीस तर तुलाही खाऊन टाकीन.

**मंदा :** ईऽऽ नको, नको.

**बन्या :** मन्या, बंड्या, तुम्हांला मी एक एक बंगला देणार आहें. आणि राजा, तुझ्याकरितां मी जीव देखील द्यायला तयार आहें.

**राजा :** जीव देशील रे. पण पैसे बैसे देशील कीं नाहीं ?

**बन्या :** राजा, अरे ते सगळे पैसे तुझेच आहेत. त्या शब्दकोडेवाल्याच्या सायकॉलॉजी नांवाच्या बाईशीं तुझी ओळख होती म्हणूनच हें बक्षीस मिळालें मला.

**राजा :** पाहिलेंस कुंदा ! आतां तरी पटली तुला माझी कर्तबगारी ? आतां तरी चल तूं माझ्याबरोबर.

**बन्या :** चला, मित्रानो चला ! आपण मजा करूं या. आधीं इंटरनॅशनल स्वीटमीट मार्ट खाऊन मग आपण ताजमहाल हॉटेल खाऊन टाकूं या.

**मंदा, सुदाम, मन्या, बंड्या** : चला. बन्या झिंदाबाद.

**राजा** : अरे, अरे ! आपली मोहीम अशी अर्धवट सोडून नका जाऊं. माझ्या मदतीला थांबा.

**मंदा, सुदाम, मन्या, बंड्या** : बन्या सरंजामे झिंदाबाद.

[ बन्यासकट हें सगळें लटांवर बाहेर जातें. ]

**राजा** : अरे बन्या, बंड्या, मन्या ! अरे एऽ ! गेले लेकाचे.

**कुंदा** : आणि म्हणे मोठी फौज आणली आहे. तुंबळ युद्ध होणार आहे.

**राजा** : कुंदा, वेडेपणा करूं नको. तो खामोष यायच्या आंत मुकाट्यानें माझ्याबरोबर चल. मी हॉटेलांत जेवणाची उत्तम व्यवस्था करायला खान-साम्याला सांगितलें आहे; रात्रीच्या सिनेमाचीं तिकिटें काढून ठेवलीं आहेत.

**कुंदा** : अहो मिस्टर, तुम्ही मला पळवून न्यायला आलांत कीं जेवणाचें निमंत्रण द्यायला आलांत ?

**सिंधूताई** : पळवून न्यायचें मेलें राहूं द्या. पण मला जेवणाचें तरी निमंत्रण द्या कीं हो राजाभाऊ.

**राजा** : आतां इतकें म्हणतांच आहांत तेव्हां जेवायला या तुम्ही. पण सिनेमाला मात्र येऊन चालायचें नाहीं हं. छट् ! सिनेमाला फक्त मी आणि कुंदा. दोघांच्या मध्यें खुर्चीचा हात देखील मला चालणार नाहीं. आणि असला तरी तो मोडून जाईल म्हणा. काय ग कुंदा !

**कुंदा** : फार चावट आहांत तुम्ही. तुम्ही जर असेच बोलत राहिलांत तर खरोखर पळून येईन मी तुमच्याबरोबर. पण नाहीं. ठरलें तें ठरलें. मला जो पळवून नेईल त्याच्याबरोबरच मी लग्न करणार.

**राजा** : तर मग मला आतां ॲक्शन घेतली पाहिजे. एखादी वेळ विचार करायची असते. एखादी वेळ कृति करायची असते. कुंदा, आतां कृति करायची वेळ आली आहे. ( खिशांतून सुताचा गुंडा काढतो ) ह्या दोरीनें तुला बांधून ......

**कुंदा :** अगबाई ! ह्या दोरीनें तुम्ही मला बांधणार ! मी म्हणजे काय पैशाची फुलांची पुडी वाटलें कीं काय तुम्हांला ?

**राजा :** दिडकीची फुलांची पुडी ? लाडके, तूं तीन लाखांचा अत्तराचा कारखाना आहेस.

**कुंदा :** भाषणें कसलीं करतां ? कृतीची वेळ आली आहे असें तुम्हीच आतां म्हणालां होतां ना ?

**राजा :** कुंदा, अजून ऐक. मला उगीच कडक उपाय योजायला भाग पाडूं नको.

**कुंदा :** कसले हो कडक उपाय योजणार तुम्ही ? एक्स्ट्रा स्ट्रॉंगच्या गोळ्या खाण्यापलीकडे कांहीं कडक गोष्ट तुम्हीं अजून आयुष्यात कधीं केली आहे का ?

**राजा :** एकच कां, अनेक केल्या आहेत. चार मिनार सिगरेट ओढली आहे. आलेपाकाची वडी खाल्ली आहे, आणि एकदा खुद्द कोळणीशीं भांडण केलंय् मीं.

**कुंदा :** बाई बाई !

**राजा :** थट्टा वाटते आहे तुला कुंदा. पण आतां सुद्धां मी एक अत्यंत कडक गोष्ट करणार आहे. माझ्या खिशांत काय आहे तें माहीत आहे तुला ?

**कुंदा :** काय बाई ?

**सिंधूताई :** मी सांगूं ?

**राजा :** भयंकर स्फोटक गोष्ट आहे.

**कुंदा :** असेल काड्याची पेटी नाहीं तर लवंगी फटाका.

**राजा :** लवंगी फटाका काय ? अं ? पिस्तूल आहे म्हटलें पिस्तूल माझ्या खिशांत.

**सिंधूताई :** पिस्तूल ?

**राजा :** होय, होय. पिस्तूल. आणि तें सुद्धां पाणी उडवायचें नव्हे तर गोळ्या झाडायचें. हें पिस्तूल म्हणजे फार भयंकर शस्त्र असतें बरें का. मघापासून तें माझ्या खिशांत आहे, तर मला अशी धास्ती वाटते आहे कीं

खिशांतल्या खिशांत उडेल. आणि मी जर तें हातांत घेतलें तर काय होईल अन् काय नाहीं तें मला सांगतां येणार नाहीं. त्यांतल्या गोळ्या कुठूनही निघतील आणि कुठेंही जातील.

**कुंदा** : पिस्तूल म्हणजे काय तुमचें तोंड थोडेंच आहे, असा वाह्यातपणा करायला ?

**राजा** : कुंदा, आतां मीं पिस्तूल हातांत घेतलें आहे. आतां तरी घाबर तूं मला.

**कुंदा** : असल्या नुसत्या तोंडी धमक्यांनीं कोणी भीत नसतें.

**राजा** : तुझ्यासारख्या सुंदर मुलींना धमक्या द्यायच्या असतात त्या तोंडानेंच. पण जाऊं दे. तूं ज्या अर्थी ऐकत नाहींस त्या अर्थी मला खिशांतलें पिस्तूल बाहेर काढलेंच पाहिजे. ( खिसे चाचपतो ) अजून विचार कर कुंदा. पिस्तूल ही किती भयंकर गोष्ट आहे त्याची कल्पना कर. तुझ्या नाहीं तर निदान माझ्या जिवाची तरी तमा बाळग.

**कुंदा** : शक्य नाहीं.

**राजा** : तर मग डोळे मिटून आणि परमेश्वराचें नांव घेऊन हें मी काढलें माझें पिस्तूल. ( डोळे मिटून राजा पिस्तूल म्हणून कंगवा बाहेर काढतो आणि कुंदाच्या अंगावर रोखतो. ) काय ? मी लटलटा कापायला लागलों आहे तरी तुला भीति वाटत नाहीं ?

**सिंधूताई** : ( डोळे मिटून ) तिला नसली तरी मला भीति वाटतेय्. तेव्हां तुम्ही आपले माझ्यावरच पिस्तूल झाडा कसे.

**कुंदा** : ( मोठ्यानें हंसत ) आई, अग डोळे उघडून पाहा त्यांच्या हातांत काय आहे तें. अहो घाबरट ! तुम्ही पण डोळे उघडून पाहा एकदा आपल्या हाताकडे. पिस्तूल म्हणून कंगवा धरलाय् तुम्हीं हातांत.

**राजा** : ( डोळे उघडून ) ऑं ! कंगवा ?

**कुंदा** : हो, हो. कंगवा. मला वाटतें कीं पिस्तूल म्हणून जसा तुम्ही कंगवा आणलांत, त्याचप्रमाणें कुंदा म्हणून ही ब्राह्मी तेलाची बाटली पळवून घेऊन जा तुम्ही. ह्या एकंदर प्रसंगानंतर डोकें थंड करायला उपयोगी पडेल तुम्हांला ती.

**राजा :** घात झाला. कोटांची अदलाबदल झाली. माझें पिस्तूल दुसऱ्या कोटाच्या खिशांत राहिलें.

**कुंदा :** बरें झालें राहिलें तें. इथें आणलें असतेंत तर तें उडवायच्या प्रयत्नांत फुकट आत्महत्या करून घेतली असतीत.

**राजा :** असती कदाचित्. पण आतां मात्र माझ्या प्रेमाची अशी बालहत्या मी होऊं देणार नाहीं. आतां जबरदस्तीनें तुला ......

[ बेगुमान् खिडकींतून प्रवेश करतो. ]

**बेगुमान् :** खामोष !

**राजा :** खामोष ! खामोष ! अरे, खुंटी कुठें गेली ती ? सिंधूताई, माझी आहे ती खुंटी. बाजूला व्हा बरें तुम्ही ! हें पाहा मिस्टर खामोष, तुम्हीं सांगायच्या आधींच मी खुंटी पकडून उभा राहिलों आहें हं.

**सिंधूताई :** हें काय हो राजाभाऊ, माझी खुंटी तुम्ही घेतलीत. आतां मीं काय करूं ?

**राजा :** तुम्ही होय ? आपले कान पकडून उभ्या राहा तुम्ही आतां. किंवा बेगुमानांचे जरी कान पकडलेत तरी ......

**बेगुमान् :** खामोष ! लुच्च्या माणसा, आतां बरोबर साडेसात वाजले आहेत. आणि तूं येथें आधीं कसा आलास ?

**राजा :** त्यांत काय आहे मोठेंसें ? माझें घड्याळ मीं पंधरा मिनिटें पुढें करून ठेवलें होतें.

**कुंदा :** लुच्चे ! अप्रामाणिक !

**राजा :** तरुण मुलींना पळवून नेणाऱ्या माणसाकडून प्रामाणिकपणाची अपेक्षा करणें हेंच चुकीचें आहे. शिवाजी महाराजांनीं काय औरंगजेबाला टेलिफोन केला होता कीं. 'हॅलो, जहांपन्हा, आतां अडीच वाजतां मिठाईच्या पेटाऱ्यांत बसून आम्ही पळून जाणार आहोंत. बाय बाय.'

**कुंदा :** पुरे झाली तुमची वटवट. आणि बरें का बेगुमान्, ह्यांनीं मला पळवून नेण्याकरितां मित्रांची एक मोठी फौजच आणली होती.

**बेगुमान् :** असें काय ? आणखी एक लबाडी. बाकी ह्याच्याच मित्रांची फौज ती. मला पाहून सगळे असेच खुंट्या पकडून उभे राहिले असते. ह्या घरांत खुंट्या नाहींत इतकीच काय ती अडचण.

**राजा :** खुंट्या नसल्या तरी तुमचें डोकें आहे कीं बेगुमान्.

**बेगुमान् :** खामोष !

**कुंदा :** नुसत्या तोंडाचाच शूरपणा तुमचा.

**बेगुमान् :** बरें आहे कुंदा. त्या मूर्खांच्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं. मीं दाराबाहेर पेटी आणून ठेवली आहे ती आंत घे. तुम्ही मदत करा हो तिला.

**राजा :** मी ? जरूर !

**बेगुमान् :** तूं नाहीं. सिंधूताई, तुम्हीं आणा म्हणतों ना ती पेटी आंत.

**सिंधूताई :** आणते ! आणते !

**कुंदा :** कित्ती शूर आहांत तुम्ही बेगुमान् !

[ दोघी पेटी उचलून आंत आणतात. ]

**राजा :** मिस्टर खामोष ! बायकांना सरळ पेट्या उचलायला लावतायू तुम्ही. कांहीं स्त्रीदाक्षिण्य दाखवाल कीं नाहीं ?

**बेगुमान् :** मला दाक्षिण्य माहित आहे तें फक्त पिस्तूलाचें.

**राजा :** हिअर ! हिअर ! (टाळ्या वाजवतो.)

**बेगुमान् :** खामोष ! खुंटी पकड आधीं.

**राजा :** जुलूम झाला ! म्हणजे चांगल्या भाषणाला टाळ्या देखील वाजवायच्या नाहींत कीं काय ?

**सिंधूताई :** किती छान पेटी आहे ग ही कुंदा ! मला वाटतें कीं हिच्यांत तुझ्याबरोबर मी देखील मावेन.

**बेगुमान् :** सिंधूताई, ही काठी पाहिलीत ना ?

**सिंधूताई :** पाहिली म्हणजे ? आमचीच आहे धुण्याची.

**बेगुमान् :** कुंदा, तूं मुकाट्यानें ह्या पेटींत बसणार आहेस कीं ह्या दोरीनें बांधून मीं तुला जबरदस्तीनें आंत बसवूं ? बोल लवकर.

**कुंदा** : नको, नको. बसतें मी. बेगुमान्, मला खरीखुरी भीति वाटूं लागली आहे तुमची.

**बेगुमान्** : चल, बस आंत.

**राजा** : आतां मात्र मी ऐकणार नाहीं. माझी प्रिया पेटींत बंद केली जात असतांना मी खुंटी पकडून उभा राहूं ? माझ्या प्रीतीचा इमला जमीनदोस्त होत असतानां मी नुसता आकाशाकडे पाहत राहूं ? माझ्या प्रीतीची ज्योत म्हणजे काय गळका कंदील आहे कीं काय असा सहजासहजीं विझायला ?

**बेगुमान्** : का ? तुझ्या प्रीतीच्या इमल्यासारखें तुलाही जमीनदोस्त व्हायचें आहे कीं काय ?

**राजा** : थांब, आतां मीच तुला धूळ चारतों. हजार वेळां खामोष म्हटलेंस तरी आतां मी घाबरणार नाहीं. तुम्ही पिस्तूल झाडलेंत तरी मला त्याची तमा नाहीं.

**बेगुमान्** : मीं पिस्तूल आणलेंच नाहीं. तुला जमीनदोस्त करायला पिस्तूल रे कशाला हवें ? पॉयशाचा फवारा बस झाला.

**राजा** : कीटका ! झुरळा ! ढेकणा !

[ बेगुमान् त्याच्या हनुवटीवर ठोसा मारतो. राजा थोडेंसें कथकली नृत्य करून खालीं पडतो. ]

**कुंदा** : अयाई ग !

**बेगुमान्** : चल, बस त्या पेटींत. बस म्हणतों ना !

**कुंदा** : बसतें, बसतें.

[ कुंदा पेटींत बसते. बेगुमान् पेटी बंद करतो. ]

**सिंधूताई** : अहो, पण मी राहिलें ना बाहेर.

**बेगुमान्** : जास्त गडबड केलीत तर खिडकीच्या बाहेर फेकून देईन मी तुम्हांला. चला. हा कांहीं पांच मिनिटें तरी शुद्धीवर येत नाहीं. तोंपर्यंत टॅक्सी आणून हमालाकरवीं पेटी हलवावी. ( दरवाजानें बाहेर पडूं लागतो. ) अरे हो. दरवाजानें बाहेर पडायचें नाहीं, हा माझा नियम विसरलोंच होतों मी.

[ खिडकींतून बाहेर जातो. ]

**सिंधूताई :** राजाभाऊ, अहो राजाभाऊ! झोपलांत काय? उठा!

[ तेवढ्यांत बन्या येतो. ]

**बन्या :** राजा, गाढवा आमच्याबरोबर पार्टीला नाहीं आलास आणि इथें जमिनीवर झोपला आहेस. ऑं! अरे ऊठ! सिंधूताई, पाणी आणा तांब्याभर. ह्याच्या डोक्यावर पाणी ओतल्याशिवाय हा नाहीं जागा व्हायचा.

**सिंधूताई :** (तांब्या आणीत) हो. पाणी ओतायलाच हवें त्यांच्या डोक्यावर. त्याशिवाय नाहीं यायचे ते शुद्धीवर.

**बन्या :** (पाणी ओतीत) ऑं! शुद्धीवर?

**राजा :** ऑं! हें काय? कुंदा कुठें आहे? बन्या! बन्या आहेत तरी किती येथें? एक, दोन, तीन, चार ... अबब! मला तर सहा बन्या दिसताहेत.

**बन्या :** शक्य आहे. अगदीं शक्य आहे. चाळीस हजार रुपये मिळाल्यावर माणसांत फार आश्चर्यकारक फेरबदल होतात. सिंधूताई, तुम्हांला किती बन्या दिसताहेत?

**सिंधूताई :** मला एकच दिसतांय तुम्ही. पण त्या बेगुमानांनीं ह्यांच्या मारला, तसा माझ्या हनुवटीवर ठोसा मारला असता तर मला देखील सहा बन्याजीराव दिसले असते.

**बन्या :** बेगुमानानें, आणि ठोसा मारला माझ्या दोस्ताला? तो बेगुमान् स्वतःला समजतो तरी कोण? किती ठोसे मारले रे तुला त्या खामोषानें?

**राजा :** मला आणि ठोसा? छे बुवा! मला असें स्वप्न पडत होतें कीं, एका धबधब्याच्या धारेंतून मी आणि कुंदा खालीं पडत आहोंत. पडतां पडतां मीं कुंदाला म्हटलें, 'लाडके...' पण तिचे ओठ माझ्या ओठांना लागण्याऐवजी एक खडकच माझ्या तोंडावर आदळला.

**बन्या :** राजा, लेका शुद्धीवर ये कीं नीट. मी तुला ताजमहालमध्यें पार्टीला न्यायला आलोंयू.

**राजा :** बन्या! तूं होय?

**बन्या :** तूं बरोबर दिसला नाहींस म्हणून तुला न्यायला परत आलों मी.

**राजा :** अरे बाप रे ! खुंटी कुठें आहे खुंटी ? मला खुंटी पकडून उभें राहूं दे. नाहीं तर तो बेगुमान् गरम होईल बाबा, बन्या. तूं देखील खुंटी पकडून उभा राहा बाबा. सिंधूताई, तुम्ही सुद्धां.

**बन्या :** डरो मत राजा ! त्या बेगुमानला मी कोहाळ्यासारखा शिंक्यांत ठेवून देतों. काय समजलाय् तो ?

**राजा :** अरे बन्या, डोकं फिरलंय् तुझं. नक्की बेगुमान्‌विषयींच बोलतोंय् मी !

**बन्या :** राजा, त्या क्षुल्लक माणसाची धास्ती मला घालूं नको. आज बक्षीस मिळाल्याचें कळल्यापासून हा बन्या पार बदलून गेला आहे. रेशनिंग ऑफिस-मध्यें नोकरी करणारा बन्या नष्ट होऊन आतां जुना कॉलेजांतला तालिमबाज बन्या पृथ्वीवर अवतीर्ण झाला आहे आज. मीं जीं वीरश्रीचीं कृत्यें केलीं......

**सिंधूताई :** काय केलेंत हो तुम्हीं ?

**बन्या :** काय केलें ? मरहूम बादशहा सातवे एडवर्ड ह्यांच्या काळ्या घोड्यावर मी स्वार झालों होतों. खड्या पार्श्वाला मीं शीर्षासन करायला लावलें. राजाबाई टॉवरला लाथ मारून मीं खालीं पाडलें.

**राजा :** राजाबाई टॉवर पडलाय् ?

**बन्या :** होय. मला तरी तो पडलेला दिसला. पण कांहीं लोकांचें म्हणणें असें कीं, राजाबाई टॉवर उभा होता आणि मी पडलेला होतों.

**राजा :** असें, असें ! आलें लक्षांत. खड्या पार्शाच्या बाबतींत असेंच कांहीं झालें होतें कीं काय ?

**बन्या :** कांहीं लोकांचें म्हणणें असें कीं, खड्या पार्शाच्या चौथऱ्यावर चढून मीं शीर्षासन केलें होतें. पण हा केवळ पाठभेद आहे, तपशीलांतला फरक आहे.

**राजा :** बरोबर आहे. बन्या, आतां तुझ्या त्याच वीरश्रीचा उपयोग करून आपण ही पेटी उचलूं या आणि पळून जाऊं या.

[ बेगुमान् खिडकींतून येतात. ]

अरे बाप रे !

**बेगुमान् :** खामोष !

**बन्या :** काय रे ए बोरूबहाद्दर! खामोष खामोष कोणाला म्हणतोस? तूं खामोष! तुझा बाप खामोष! तुझा आजोबा खामोष.

**बेगुमान् :** मूर्ख माणसा! तुझ्या मित्राची कणीक तिंबली ती पुरे नाहीं झाली? स्वतःचें धिरडें करून घ्यायची इच्छा आहे कीं काय तुला?

**बन्या :** अरे जा रे धिरडें करणेवाला. मसाला डोसा करून टाकीन तुझा

**बेगुमान् :** तूं कोणाशीं बोलतो आहेस ह्याची जाणीव आहे का? पाचशें रहस्यकथांचा लेखक बेगुमान् म्हणतात ह्या प्राण्याला.

**बन्या :** आणि शब्दकोड्यांत चाळीस हजार रुपये मिळविणारा बन्या म्हणतात ह्या पठ्याला.

[ दोघे एकमेकांच्या अंगावर धावून जातात. बन्या
एक ठोसा मारून श्री. बेगुमान् ह्यांना झोपवतो. ]

सिंधूताई, चांगलें बादलीभर पाणी ओता ह्याच्या डोक्यावर.

**राजा :** बन्या, चल लवकर. त्या बाजूनें उचल ती पेटी.

**बन्या :** नाहीं उचलत, तूं कोण मला सांगणार?

**राजा :** तसें नव्हे बन्या. तुझी ताकद किती वाढलीय् तें बघायचें आहे मला.

**बन्या :** हं! अरे हीच काय, पण अश्या छप्पन्न पेट्या उचलीन मी. ही बघ उचलली.

**राजा :** छान! छान! घेऊन चल आतां ही पटकन्.

[ दोघे पेटी घेऊन जातात. ]

**सिंधूताई :** अहो! अहो! मला न्या ना पळवून. गेले ते. माझी मेली कोणी हौसच करीत नाहीं.

**बेगुमान् :** ( उठून ) कुंदा, कुंदा, कुठें आहेत ते बदमाष?

**सिंधूताई :** पुन्हा कुंदा! तुम्हांला कुंदा हवी काय? आणि मला मात्र नको पळवून न्यायला. तें काहीं नाहीं. राधाबाईनीं ह्या मेल्याच्या टाळक्यांत काठीनें मारलें तसें आतां मी पण मारतें. तेवढीच मेली माझी हौस होईल.

[ सिंधूताई बेगुमानना काठीनें झोडपतात. बेगुमान्
'ओय् ओय्' असें ओरडत असतांनाच पडदा पडतो. ]

---

माझ्या या नाटकाचा पहिला प्रयोग भारतीय विद्याभवनच्या कलाकेंद्रातर्फे
दि. ११ मे १९५२ रोजीं प्रथम भारतीय विद्याभवनमध्ये झाला
अर्थात माझ्याकडून हें नाटक लिहून घेण्याचें आणि त्याचा
प्रयोग करण्याचें श्रेय त्या कला केंद्राचे एक सभासद
श्री. पद्माकर नागपूरकर यांना आहे. या
प्रयोगाचें दिग्दर्शन श्री. आत्माराम
भेंडे यांनीं केलें असून त्यांत
खालील सभासदानीं
भाग घेतला.

**राजा** —श्री. आत्माराम भेंडे
**बन्या** —श्री. केंकरे
**बेगुमान** —श्री. नरहर हिंदळेकर
**कुंदा** —श्रीमती आशा भेंडे
**सिंधुताई**—श्रीमती नीला दिघे
**मंदा** —श्रीमती शालिनी शेणवी
**सुदाम** —श्री. सामंत
श्री. जयवंत खानोलकर वगैरे.

प्रयोगांतील सर्व छायाचित्रें श्री. डी. एस. मालवणकर व श्री. व्ही. पालेकर यांनीं घेतलेलीं आहेत.

**गंगाधर गाडगीळ**

